## कथानुक्रम

. १ .

# कथाई

—'लिहिलं पाहिजे...लिहिणं अपरिहार्य आहे'...हृदयाच्या गाभाऱ्यांत घंटानाद होत होता आणि त्या आवाजानें प्रतिभेची ज्योत कंपित होत होती. विस्मृतींत गंजत पडलेली एक अर्धीमुर्धी घटना आज आलेल्या अनुभूतीच्या लोहचुंबकाला चिकटली; मज्जातंतूंच्या टणत्कारांत नवे सूर काढीत मनांत झपूर्झा घालूं लागली. जाग्या झालेल्या पाळण्याकडे धांवणाऱ्या मातेच्या तत्परतेनें मीं टेबलाकडे धांव घेतली. हृदय ओसंडत होतें व पेनमध्यें शाई भरली जात होती. दिवा जरा दूर सरकवला, कागद पुढें ओढले, अन् लिहिण्यास सुरुवात केली.

एक ओळ जेमतेम उतरवली गेली अन् मीं थबकलों.—अशीच सुरुवात करायची? शेवटाची सावली पडेल अशी? कीं कांहींच कल्पना न यावी अशी? —कळेना. विचारांचा गुंता होऊं लागला; अन् थर्मामिटर फुटून पारा सांडावा तशी मनांत उभारलेली कल्पना समोर अस्ताव्यस्त पसरली. सांधतांहि येईना, हातींहि धरवेना. मधलाच शब्द खोडला. मग आणिक एक ओळ लिहिली. पुन्हां खोडली...सरड्याच्या धांवण्यासारखें होऊं लागलें...

तेव्हां मीं नवाच कागद घेतला व नव्या उत्साहानें जुळणी करूं लागलों. लेखनास प्रारंभ करतांना असाच त्रास होतो अशी स्वतःची समजूत घातली आणि निसटणाऱ्या, भुलवणाऱ्या कथामृगावर शरसंधान करूं लागलों. दोन परिच्छेद एका दमांत लिहून काढले तेव्हां मनाला समाधान लाभलें. आनंदाच्या गिरक्यांत इतका खालीं आलों कीं, दाढी झाल्यानंतर आरशांत प्रसन्नपणें पाहतांना जसं वाटतं तसं तो कथेचा कागद पाहून वाटलं.

क्षणकाल कथा संपूर्ण लिहून झालेल्या स्थितींत माझ्यापुढें प्रगटली. त्यावर माझं नाव घालायचं होतं तें मीं घातलं...मग नांव तेवढं उरलं. मोठं होऊं

लागलं. त्या नांवावर प्रसिद्ध झालेल्या अनेक कथा आठवल्या. हमरस्त्यावरच्या सार्वजनिक दिव्याभोंवतीं लाखों पांखरें भरकटत रहावींत तशीं छापील पानं माझ्या नांवाच्या पाटीपुढें फडफडूं लागलीं. कथेचीं, स्तुतीचीं पानं नि नांवाची चमकती निऑन् साईन! आणि दिपलेल्या डोळ्यांना परत समोर पडलेल्या कथानकाचीं अक्षरें दूरच्या ताऱ्यांसारखीं दिसूं लागलीं...

आतां लौकिकाचा कैफ चढण्याऐवजीं आत्मविश्वास अन् जबाबदारी वाढली व आळस टाकून मी लेखणी उचलली. मग सगळंच विसरलं गेलं. स्वतःला विसरलों नि काळवेळाचं भान हरपलं. कथानकांतल्या व्यक्ति समोर ठाकल्या. नायिकेचे अश्रु, आपल्या अपत्याबद्दलचं...

पुन्हां पेन थबकलं. थरथरलं. समाधि भंगली. भानावर यायला वेळ लागला. जाग आली तीच शिणवठा घेऊन. अनुभूतीचा मंद सुगंध व नाजूक सौंदर्य जपतांना दुसऱ्याच अडचणी उभ्या राहिल्या. किरकोळ, पण अडविणाऱ्या. —नायिकेचं नांव काय ठेवायचं? तिच्या वर्णनावरुन व वागण्यावरुन वाचकांना ती मनू म्हणून ओळखतां तर नाहींना येणार? तिला एकाऐवजीं दोन मुलं दाखवलीं तर सत्यवस्तु लपवितां येईल—पण मग दुसरं एक कथानक मनांत घोळत आहे तें फुकट जाईल! कीं त्यांतलाच विचार ह्याहि कथेंत मिसळावा? मनूच्या नवऱ्याची मनःस्थिति आपल्याला बरोबर उमगली आहे काय—कीं माझ्याच भावनांचा आरोप त्याच्यावर होणार आहे? त्या असंतुष्ट नवऱ्याच्या ठिकाणीं स्वतःला कल्पिण्यांत मला सुख वाटत आहे का—कीं घटना दहा वर्षांपूर्वीं नेल्या व...

यादी लांबत चालली. मूळ सुचलेली कल्पना नि पाहिलेल्या व्यक्ति ह्यांचीं किती व कशीं भिश्रणें करावींत ह्याचा विचार सुरू झाला. भेसळ होऊं लागली, गुंतागुंत झाली, गढूळपणा वाढला. अनेक फाटे फुटले व अनेक कथानकें तयार झालीं. ज्या साक्षात्कारानें भारावून लेखनाची बैठक मांडली होती ती मोडली व कळसूत्री बाहुल्या नाचवणाऱ्या बहुरूप्यासारखा मी विचारांशीं नि अक्षरांशीं चाळा करीत राहिलों.

—सर्व घटना घडल्या तशाच लिहिल्या तर काय बिघडतं? माझं गुदमर-लेलं मन टकटकलं व मनूची टक लावून पाहणारी मुद्रा आठवली. पण वाटलं

जाणिवेची वेगळी आकृति मनांत तयार झाली आहे...परंतु हें तरी...पुन्हां घोटाळा, पुन्हां झगडा !

पेन परत टेबलावर गेलं. बोटं काळीं झालीं होतीं व शब्दांचे कोळसे समोर पडले होते. लिहूंच नये, ह्यापुढें कधींच लेखन करूं नये, असा विचार मनांत आला. नाहींतरी सगळा खेळच चालला आहे. भातुकलीच आहे हें साहित्य-लेखन म्हणजे ! आपलीं अन् आपल्या क्षुद्र जगाचीं इवलीशीं, क्षणिक सुखदुःखें ! त्यांना काय अर्थ आहे ?–काय महत्त्व आहे ? कुठली ती क्षयी मनू नि तिचें...

खिडकीबाहेर अंधार पसरला होता. सारं जग निद्रेच्या दुलईत शांत होत होतं. बॉंबहल्ल्याच्या भीतीनें शुकशुकाट व्हावा तशा भोंवतालच्या इमारती रित्या वाटत होत्या व स्मशानयात्रेनंतर उधळलेलीं फुलंच उरावींत तशा आकाशांत तारका विखुरलेल्या वाटत होत्या. स्वानुभूतीच्या क्षुद्रतेची जाणीव मलाच उदास, भयभीत करीत होती. पडक्या देवळांत, पणतीच्या जवळ चुकलेला प्रवासी कुडकुडत बसावा तशी टेबलापाशीं, टेबललॅंपजवळ माझी आकृति दीनवाणी बसली होती.

सुस्कारा टाकून मीं मनांतली स्फूर्तीची इवलीशी ज्योत विझवून टाकली. बोटं मोडलीं व हात लांब करीत खुर्चीवर रेललों. मान मागें टाकली व तशीच मागच्या भिंतीकडे दृष्टि फेकली. भिंतीवर खिडकीची चौकट व उभे गज गावली धरून होते. त्यांत माझी आकृति अडकली.

मी दचकलों. तसं कुठेंतरी पाहिलं आहे, असं गजाआड असलेलं कुणी मनांत रुतलं आहे असं जाणवलं. एखादं पिंजऱ्यांतलं पांखरूं...वर्तमानपत्रांत पाहिलेलं कुणा कैद्याचं कार्टून...अन् मग पुन्हां दचकलों.

खान अब्दुल गफारखानांची तुरुंगाच्या गजाआड उभी असलेली आकृति मला स्पष्ट दिसली !

—गजाआडची ती आकृति माझ्या मनाच्या तळघरांत राहिलेली होती. गफारखानांना मीं पाहिलं नव्हतं. तुरुंगाच्या कोठडींतहि मी स्वतः कधीं गेलों नव्हतों. पण गफारखानांची भव्य, धीरगंभीर, गजाआड उभी असलेली आकृति माझ्या मनांत केव्हांतरी ठसली गेली होती. कधीं, कां, कुणास ठाऊक ?—पण कित्येकदां सैतानी बेड्यांत जखडलेला तो संत माझ्या दृष्टींपुढें स्पष्ट उभा

## ४ : ५

मी गडबडलों. जरा हाललों तर ती आकृति नाहींशी होईल, तो साक्षात्कार अंधुक होईल, ही जाणीव असूनहि मी सांवरून बसलों. टेबलावरचे कागद धूलिकणांसारखे झाले होते. आणि समोरच्या आकाशाच्या तुकड्यांत मातृ-भूमीच्या पाडलेल्या तुकड्यांच्या वेदना दिसत होत्या...लुटालूट, जाळपोळ, बलात्कार...आणि मूकपणें तुरुंगांत जगणारी ती महान् विभूति !

बादशहा गफारखानांच्या रूपानें मला जगांतलीं सारीं आसवें, मंगलें, माणुसकी दर्शन देत होती. आमच्या नादानपणाची, कृतघ्नपणाची, क्षुद्रपणाची जाणीव करून देत होती.

—खानसाहेबांचें नांव घे, त्यांच्यावर काव्य कर, दीर्घ कथा लिही. त्यांत जगातलं सारं काव्य नि कोडं आणतां येईल—माझं चांचपडणारं मन म्हणालं. स्वतःचं, मनूचं क्षुद्र दुःख काय रंगवायचं ? त्या केवळ वैयक्तिक भावना, अल्पजीवी अडचणी ! स्वतःचे गंड थंड व्हावेत म्हणून लेखणी झिजवायची ! उलट गफारखानांच्या जीवनांत साऱ्या जगाचं...

माझ्या पेनला पंख फुटले. हृदय विस्तारलं व शरीरांत धगधग वाढली. काय लिहूं ? गगनाला गवसणी कशी घालूं ? सारा समाज कसा ढवळून सोडूं ?—पंजाबच्या नदीवर पिंड ठेवून राष्ट्रीय श्राद्ध कसं पार पाडूं ?—मी विचार करीत होतों. कांहींतरी भव्य, दिव्य लिहायलाच पाहिजे. सामाजिक आशयाचं, राष्ट्रीय ऋणाचं !

तोकडे पंख व लांब ढांगा असलेलं मनाचं शहामृग भाबडेपणीं जरा धांवलं व थबकलं. गजांच्या चौकटीकडे असहायपणें पाहूं लागलं. काय लिहूं ? अनुभूति कुठं आहे ? अवलोकन कुठं आहे ? स्वतःच्या पायांत बेड्या असतांना समोरचे गज वाकवायचं बळ कुठंय् ?—पुन्हां ती देवमूर्ति दिसली. अन् मग परत लांडग्यांचे कळप, सतींची बेअब्रू, माणुसकीची होळी, आग, लुटालूट, खून, विनाश...अंधार, शांतता...दिवे, दिव्यांची आरास, राजधानींतले उत्सव, पुढाऱ्यांची वरात...आनंदी आनंद, स्वास्थ्य, संतोष...अन् माझं संथ आयुष्य !—

मी भानावर आलों. लाज वाटेल ह्या भीतीनें भानावर यायचं नव्हतं, पण नाइलाजानें जाग्यावर आलों. स्वतःचं समाधान करून घेण्यासाठीं कृत्रिम दुःखाची कांस धरली. पळवलेल्या स्त्रियांची किंकाळी कान लावून ऐकायचा

यत्न केला. त्या स्त्रियांचे अश्रु मनूच्या अश्रूंच्याच जातींतले ! मनूच्या स्मृतीनें जरा धीर आला. मनूचीं ओघळणारीं आसवें तळहातांत घेऊन त्यांत माझें प्रतिबिंब पाहतांच बरें वाटलें. गजाआड अडकलेल्या गफारखानांपासून लपून राहायचं असेल तर अश्रूंचे ते बुडबुडेच योग्य होते.

अंमळशानें अधिक धीर आला. लाजहि कमी झाली व समर्थन सुचलें. जें मीं पाहिलें नाहीं तें काय कागदावर आणूं ? देशाची फाळणी झाली हा माझा दोष नाहीं. मी फाळणीच्या हत्याकांडांत हात चोळीत राहिलों हा माझा उणेपणा नाहीं. खेरीज ह्या विषयावरच मीं लिहावं, मींच लिहावं, हा कां अट्टाहास ?—ओढून ताणून, आव आणून व ढोंग सजवून खोटं लिहिण्यापेक्षां न लिहिणं श्रेयस्कर नव्हे काय ?—पळवलेल्या असंख्य अनामिकांपेक्षां गांजलेल्या शेजारणीची कहाणी काय कमी हृदयवेधी आहे ? मनूच्या दुःखानें साऱ्या दलित स्त्रीजातीचं दुःख मी पुढें मांडीन ! मनूचं दुःख तसं सर्वस्पर्शीच आहे. किंवा जगावेगळंहि असेल. म्हणून काय झालं ? मला तेंच रंगवायचं आहे. मला मनू रंगवायची आहे. त्या चित्रांत माझ्या साक्षात्काराचे ठसे काढायचे आहेत. कंप पावणारं माझं हृदय मला उघडं करायचं आहे.

...माझ्या समाधानासाठीं, माझ्यांतल्या कलावंतासाठीं मला प्रामाणिक राहायला पाहिजे; अनुभूतीला उजळा द्यायला पाहिजे. लिहिलंच पाहिजे. लिहिणं अपरिहार्य आहे !...

माझ्या नसा परत उसळल्या व मीं पेन उघडलं. वैयक्तिक सुखदुःखांत सारा विश्वाचा पसारा दिसत होता. त्यांत मला हिंडायचं होतं व जीविनाचा आज जाणवलेला लचका उचलून आणायचा होता. कथानकाचा मघां तुटलेला धागा शोधूं लागलों. मनूची कहाणी आठवीत डावा तळहात डाव्या कपाळीं टेकला. जणूं त्या दिशेला असलेलं पाकिस्तान पुन्हां दृष्टीपुढें यायला नको ! नसत्या आठवणी नकोत म्हणून जरा उजव्या बाजूला झुकलों व मनूच्या नवऱ्यानें आपल्या मुलाला जेव्हां...

परत मन थांबलं. डोळे कागदावरून, टेबलावरून, आकाशाकडे चालूं लागले. पण खिडकीला अकस्मात् कांचा चिकटल्या व त्या बंद कांचांवर दृष्टि अडखळली. कांचेच्या पलीकडे चपट्या नाकांचीं, बारीक डोळयांचीं, सपाट केस कांपलेलीं, गोल चेहऱ्यांचीं असंख्य मुलें दाटीवाटीनें उभीं होतीं !

## ६ : ७

सगळयाच बालकांच्यावर अतिशय दुःखानें, अनामिक भीतीनें अशी झडप घातली होती कीं, त्यांच्या तोंडावर कसलीच कळा उरली नव्हती. तरी त्यांच्याकडे पाहतांच काळजांत चर्रर्र होत होतं. तरी तीं अजाण बालकंच होतीं.

भीषण संहारांत घरदार, आईबाप गमावून बसलेलीं, कोंवळया हृदयांनीं अनन्वित क्लेश व अत्याचार पाहिलेलीं कोरियन बालकें !

...खिडकीच्या कांचा विस्तारल्या. मेंढ्यांच्या कळपासारखे बालकांचे थवेच थवे दिसूं लागले. स्मित केलं, बोट पुढें केलं, लिमलेटची गोळी दाखविली, कांहीं केलं तरी कुणी हालचाल करीत नव्हते. त्यांचे चेहरे तसेच भकास होते. त्यांना कशाचा आधार वाटत नव्हता, आपलेपणा वाटत नव्हता. कांहींच वाटत नव्हतं !—

कांहीं महिन्यांपूर्वीं एका वार्तापटांत पाहिलेल्या ह्या बालकांच्या तांड्यांनीं माझ्या हृदयाला चीर पडली होती आणि तेथून कळत नकळत रक्त वहात होतें. हजारों कोस दूर असलेलीं तीं मुलं आठवलीं कीं मी हतबुद्ध होत असें. आजहि मी एकदम वारा गेलेल्या माणसासारखा हलक पडलों. डोळे भरून आले तरी तसाच बधिरपणें पाहत राहिलों.

हळूहळू कांचा वितळून गेल्या. मुलांचीं तोंडं नाहींशीं झालीं. खिडकीबाहेर काळोखाचा समुद्र गर्जना करूं लागला. मी शहारून भानावर आलों. हृदयाचा कलश रिकामा पडला होता. उघड्या पेनकडे केविलवाण्या नजरेनं पाहिलं. ...निष्पाप कोरियन मुलांच्या दुःखाखेरीज आज कोणतं मोठं दुःख जगांत आहे ? पडद्यावर का होईना, पण तीं असंख्य प्रश्नचिन्हें पाहिल्यावर आतां पलिकडच्या आळीतल्या अर्धवट ओळखीच्या मुलाची गुळचट कुचंबणा उबवण्यांत मूर्खपणाच नव्हता काय ?

—लिहायचीच तर कोरियन बालकांची समस्या लिहावी. जगड्व्याळ दुःखावर झेप घालावी. साऱ्या जगाला जागं करायचा यत्न करावा...

माझं हृदय, एखादी प्रचंड घंटा वाजत राहावी, तसं गर्जत होतं. त्याच्या नादांत माझ्या वैयक्तिक भावनांची इवलीशी पाकोळी अंग चोरून, कंठ दाबून बसली होती. वेळ जाऊं लागला, पण मनाला शिकवून, पटवूनहि मला आवेश येईना. बोटांतलं रक्त पेनमधल्या शाईंत मिसळत नव्हतं.

'कोरियन कहाणी–' हें योजिलेलं काव्य मीं लिहिण्यापूर्वीच रद्द केलं होतं. परवांच. परवां मला अशीच टोचणी लागली तेव्हां मीं कोरियन बालकांचं दुःख शब्दरूप करायचं ठरवलं. पण मग वाटलं की मिनिटभर पाहिलेलीं चित्रं व चार लोकांनीं लिहिलेलीं पत्रं ह्या सामुग्रीवर लिहिलेलं वाङ्मय किती सखोल, सच्चं होईल? केवळ कळवळ्यापोटीं मीं ह्या कारुण्याचा आविष्कार करायला घेणें चुकीचे नाहीं काय? हजारों योजनें दूर राहून, थंड मुर्दाड वस्तींत सुख-वस्तु जिणें जगून, कोरियनांच्या प्रश्नाला हात घालणें हें एक प्रकारें दांभिकतेचें, बेगडीपणाचें लक्षण आहे. सभोंवतीं कोरियन बालकांच्या कित्येक लहानश्या लपलेल्या प्रतिकृति आहेत. त्यांच्यावर लिहिणें, त्यांचा...मनूचें तें निरागस, दुर्दैवी मूल !—

चपट्या नाकांच्या व चेतनारहित चेहऱ्यांच्या शेंकडों बालकांतून तें मूल पुढें आलें. मीं खिडकीकडे हात केले व म्हटलं, 'ये राजा. तुझ्या आईनं तुला दुःखांत वाढविण्यासाठीं जन्म दिला नाहीं. तुला समजत नाहीं, पण...'

माझ्या पात्रांशीं बोलण्याचा माझा चाळा सुरू झाला. आणि एकीकडे निश्चय होत गेला कीं ह्याचंच चित्र मी रंगवीन. इतक्या अस्सल, कोमल रेखा काढीन कीं त्या काळाच्या रबरालाहि पुसतां येणार नाहींत. ह्याचं जीवित शब्दरूप करणं हेंच आतां शब्दांचं व माझं कार्य. त्यांतच कोरियन मुलांचं दुःख उतरल्या-सारखं होणार आहे.

मुलाला मीं मनूच्या कडेवर दिलें व बाह्या सरसावून कागदांना जवळ केलें. मनू, मनूचें मूल, मनूचा नवरा...कोळ्याच्या कौशल्यानें कथानकाचं जाळं मनांत विणण्यास सुरुवात झाली. प्रतिभेची ज्योत पुन्हां फुलली व त्याचा मत्त गंध सर्वत्र दरवळूं लागला...पण लिहिण्यापूर्वीं विचार केला कीं, आणिक कांहीं शंका, समस्या असतील तर त्या आत्तांच डोळ्यापुढें येऊं दे! पुन्हां त्यांच्या दर्शनानें हतबल होऊन स्वानुभूतीला क्षुल्लक मानलं जाऊं नये.

––महाराष्ट्राचे प्रश्न, जिल्ह्याजिल्ह्यांतले दुष्काळ, ब्राह्मण-अब्राह्मण तेढ, आर्थिक विषमता, शेतकऱ्यांचें...अनेक विचार ओळीनें येऊं लागले व जीव क्षणमात्र व्याकुळ झाला...क्षणभर वाटलं कीं, ह्या विषयावर मला वाटणारा कळवळा छापील आहे. खरोखरीची अस्वस्थता, आर्तता नाहीं वाटत ह्या प्रश्नांच्या जाणिवेनें!...क्षणभर असे उलटसुलट बरेच विचार आले...मग त्या सर्व

प्रश्नांना ओळींनें ओवून टाकतांत मनूच्या व्यथेची सुई सरसर पुढें आली. हृदयाला टोचूं लागली. सामान्य माणसापासून, समाजाच्या लोंढण्यापासून दूर राहून चालणार नाहीं. पाहिलं पाहिजे, भोगलं पाहिजे--असे विचार डोक्यांत थैमान घालीत होते आणि तरीहि मनूच्या आज ऐकलेल्या करुण कहाणीनें हृदय कासावीस होत होतं...फुलं गंध उधळीत होतीं, सुईची तीक्ष्णता सारखी जाणवत होती.

मनाचा फारच गोंधळ होऊं लागला तेव्हां तुकोबांचे अभंग म्हणायला मीं सुरुवात केली. ज्ञानदेवाची आदरयुक्त भीति वाटे, पण तुकोबा माझा मोठा भाऊ! त्यानें तर वैयक्तिक आशाआकांक्षा बाजूला ठेवल्या, समाजांतले दंभ उघडकीस आणले...असं कसं...त्यानें तर समाजाला दूर लोटलं अन् वैयक्तिक आकांक्षेसाठीं वेड पत्करलं...तुका म्हणे ज्यानें...

मी गप्प झालों. कपाटावरच्या फोटोफ्रेमकडे दृष्टि वळवली. उकिरड्याशीं मरून पडलेलीं कुत्रीं आणि त्या मृतदेहाच्या स्तनांशीं लुचणारीं तिचीं आंधळीं पिलं! महान् अर्थ, महान् प्रतिभा दर्शविणारें तें चित्र! तें तरी मार्ग दाखवूं दे...

--नेहमीं लिहितांना असं कधीं होत नसे. आगकाडीसारखी प्रतिभेची ज्योत शिलगवली जाई. अन् सिगरेटच्या धुरासारखे हलकेफुलके लेख तयार होत. पण आजच, हल्लींच...माझं हृदय कमी संवेदनक्षम, जास्त चिकित्सक, पुरं कडवट बनलं आहे काय?—

मनू नको, तिचा संसार नको, हा समाज नको, कोरिया, बादशहा खान, कोणी कोणी नको--तें लेखनच नको असा निर्णय तांबरलेल्या डोळयांनीं मीं घेतला. लेखनाचा शीण, दुसऱ्याबद्दल कळवळा, समाजांतलीं शल्यें—काय करायची आहे सारी कटकट?

माझं मन अशी निरवानिरव करीत असतांनाच मनूनें दाबून ठेवलेलीं आंसवें एकाएकीं मोकाट सुटलीं. दूरच्या पडक्या किल्ल्यांतल्या खांबांतल्या लहानशा खड्यांत सारा ताजमहाल दिसावा तसें त्या परित्यक्तेच्या आंसवांच्या थेंबांत बादशहा खानांच्या, कोरियन बालकांच्या, दुष्काळ पीडितांच्या, साऱ्या समस्यांचें दर्शन झालें.

—थंड आंसवांनीं रक्त उकळलं, वाहत्या शाईत मिसळलं. मग सगळंच विसरलं गेलं. स्वतःच्या कर्तृत्वाचा, प्रतिभेचा पंगूपणा पटूनहि माझं हृदय

झेपावलं. मनूच्या आयुष्यांत, अडचणींत मी एकजीव झालों. स्वतःचीहि ओळख उरली नाहीं. मनांतलीं दृश्यें पुसलीं गेलीं व अंगांतले कपडेहि जड झाले. एकसारखं, अपरिहार्यतेनें लिहीत राहिलों. मी लिहीत होतों. मनू, माणुसकी लिहीत होती...



. २ .

# रिक्ता

एका आळींत तीनचार वर्षं राहून तिला कधीं पाहिलेलं मला आठवत नाहीं. लक्ष जावं, कुतूहल वाटावं, ओळख करून घ्यावी, असं तिच्यांत कांहीं नव्हतं, हें एक ह्याचं कारण असावं. श्रीमंती थाटमाट अगर एखाद्या कलागुणाचा डौल ह्या गोष्टी तिला पारख्या होत्याच, पण थोडी आकर्षकता अगर सुदृढताहि तिच्यापाशीं नव्हती. तसं पाहिलं तर मन थबकवणारी कुरूपता किंवा मूढताहि तिच्या ठायीं नव्हती. कसलंहि व्यक्तिमत्व जणूं तिला वर्ज्य होतं. संसार वाऱ्यावरचा नि नवरा तऱ्हेवाईक. दोन लहान मुली, पण त्या मृत सवतीच्या. म्हणून कदाचित् 'अमकीची आई' असं आपल्याकडे मूल हिंडवणाऱ्या स्त्रियांना सरसकट ओळखलं जातं तसंहि तिला ओळखलं जात नव्हतं तिचं खरं वा उपरं नांव आजहि मला ठाऊक नाहीं. अशी हीनदीन अन् नकारात्मक जीवन असलेली, कोठलंहि वैशिष्ट्य नाकारली गेलेली स्त्री आजवर मीं पाहिली नव्हती. म्हणूनच ती जेव्हां माझ्या सरळ, प्रगत आयुष्यांत आली, तेव्हां मी जरा चकित झालों, जरा चिडून गेलों.

आळींतल्या इतर स्त्रीवर्गाची मला फारशी माहिती होती अशांतला भाग नाहीं. कित्येक पुरुषांशीं आपला परिचय असतो. रस्त्यांत थांबून आपण बोलतों किंवा कधीं घरीं जाऊन चहा घेतों. पण घरच्या स्त्रियांशीं आपला संबंध येतोच असं नाहीं. स्त्रियांशीं परिचय करून देण्याची आपली पद्धत नाहीं त्यामुळं कांहीं अडतं असंहि नाहीं. ही अमक्याची बहीण, वहिनी इत्यादि आपण हेरतों व दूर होतों. तरी पण रंगनाथाची व माझी ओळख असूनहि त्याची पत्नी मला दोन जणींतूनहि ओळखतां आली नसती. रंगनाथबरोबर ती फारशी नसे. अन् एकटी असतांना दृष्टि जाईल असं तिच्याजवळ कांहीं नसे.

रंगनाथ आमच्या आळींत राहायला येण्यापूर्वीपासूनच मी त्याला पाहात होतों. माझी त्याची दोस्ती नाहीं. आमचीं आयुष्यं वेगळया चाकोरींतलीं. जीवनाच्या पातळयाच वेगळया. मी रसायनशास्त्राचा प्राध्यापक व तो हरहुन्नरी नट. नाटयोत्सवांत लहानसहान भूमिका तो करी. गणेशोत्सवांत त्याच्या नकला होत. गांवोगांवीं तो सारखा हिंडत असे. अभिनयाचे प्रयोग करून पैसे मिळवी व तेथल्या लोकांचीं नाटकें बसवी. सदा कफल्लक व सदा धुंदींत. ह्या महाराष्ट्रांत नाटयप्रेमानं शून्य प्रतिभेचीं पण अनिवार्य उत्साहाचीं जीं अनेक मुलं वेडीं झालीं, संसार उधळायला सिद्ध झालीं, त्यांचं रंगनाथ हें एक करुण उदाहरण. स्वतःला तो अर्थात् महान् नट समजे. 'अभिनयचक्रा'सारखीं पदकें व 'नटश्रेष्ठा' सारख्या पदव्या त्याच्या संग्रहीं होत्या. स्वतःला तो गणपतराव जोशी, बाबूराव पेंढारकर ह्यांच्या मालिकेंतला मानी. "गोखलेसाहेब, पृथ्वी थिएटर्ससारखी एक कंपनी काढतोंय् मीं..." "उद्यां फुरसुंगीला प्रोग्राम आहे माझा...", "तुम्हांला एकदां आयागोचं इंग्रजींतलं भाषण म्हणून दाखवणार आहें..." तो मला रस्त्यांत भेटे व सांगे. 'प्रा.' एवढ्या उपाधीवर तो मला मान देत असावा व शेक्सपिअरबद्दल सांगत असावा. कदाचित् पैशाच्या अडचणीमुळंहि हें असावं. कारण तो बऱ्याच वेळां पैशाची मागणी करीत असे. "प्रोफेसरसाहेब, जरा दोन रुपये द्या. संध्याकाळीं परत करतों...", "गोखलेशेठ, दहा रुपये आठवड्याकरितां देतां का ? माझे रेडियोचे आले कीं तुमचे लगेच देतों..." रस्त्यांत तो मला गांठून मागणी करी. उत्सव, नाटकं, रेडियो इत्यादि उत्पन्नाच्या यादींत माझंहि नांव त्यानं घातलं असावं. कारण तो वारंवार व हक्कानं मागणी करी. मी कधीं देई, कधीं निम्मे देई, कधीं देत नसें. 'प्राध्यापक' असलों तरी आमचं आखीव बजेट अशा मागण्यांनीं कोसळून जाई. तो पैसे मागूं लागला कीं मलाच संकोचल्यासारखं होई. अन् त्यानं पैसे परत केले कीं, महिन्या-दीड-महिन्यानं तो परत मागणी करणार ह्याचं भय वाटे. रंगनाथला ह्या व्यवहाराचं कांहीं वाटत नसे. कलंदर वृत्तीचा तो इसम निःसंकोच पैसे मागे व प्रामाणिकपणें परतहि करी. कधीं तर तो आपल्या नऊ वर्षांच्या पोरीलाच पैसे मागायला, परत द्यायला धाडून देई.

पैशाच्या व्यवहारापेक्षां रंगनाथ पैसे मागायला पोरीला धाडतो ह्याची मला चीड वाटे. पहिल्या बायकोची धाकटी मुलगी पंगू असल्यानें घरींच असे म्हणे.

पण ही नऊ वर्षांची थोरली पोर काळी, लुकडी असली, तरी चुणचुणीत व गंभीर होती. बापाबरोबर बरेच वेळां ती असे नि मी कुठं दिसलों कीं, " गोखलेकाका—" म्हणून हांक मारी. परकर नेहमीं फाटकाविटका नि तेल-पाणी न लावलेल्या केसांच्या झिपऱ्या. दळणटिपण घेऊन ती कडेकडेनं विचार करीत जात असे. कधीं घरीं येई व मी एकटाच असलों म्हणजे घुटमळत म्हणे, " बाबांनीं पैसे मागितले आहेत—दोन रुपये—" माझ्याकडे कुणी आलं अगर माझी ताई आजूबाजूला असली, तर ती लगेच म्हणे, " फुलं हवींत, घेऊं ? " दारिद्र्यामुळें तिच्या अंगीं आलेला हा समज पाहून मला कसंसंच होई. तिची दया येई व रंगनाथाचा राग येई. तिला पैसे देत मी मनाशीं म्हणे, " हा व्यवहार थांबवलाच पाहिजे. मुलीला धाडायचं म्हणजे काय ? अन् नेहमीं नेहमीं कुठून पैसे आणूं मी ? "

अखेर एक दिवस अशीच ती पोर नि रंगनाथ दारांत दत्त म्हणून उभीं राहिलीं. मुलीनं दहाची नोट मला दिली व रंगनाथ उत्साहानं म्हणाला, " तुमचे पैसे ! उद्यां देईन म्हटलं होतं, पण आज दुपारीं मी जातोंय् उज्जैनला. तिथं कालिदासाचा उत्सव आहे... "

मीं त्याची बडबड ऐकत पैसे घेतले व त्याच क्षणीं ठरवलं कीं, ह्यानं परत करण्याची इतकी तत्परता दाखवली, तरी आतां हा व्यवहार बंद !

त्यानंतरच्या सोमवारीं सकाळीं ती पोर जेवायच्या वेळेला माझ्या दारांत आली. माझं जेवण आटोपलं होतं. पण ताईचा मागला भात चालला होता म्हणून तसाच गप्पा मारीत मी बसलों होतों. बागेंतल्या बाजूनं ती पोरगी डोकावली व बागेंतच घोटाळूं लागली. तिला पाहतांच माझ्या कपाळावर आठी उमटली. ' कालिदास इथंच राहिला, अन् पुन्हां आमच्या खिशाला...' माझं मन चिडून म्हणालं व मी जोरानं ओरडलों, " काय ग बेबी ? "

" कांहीं नाहीं—" ती पुटपुटली व तोंड लपवूं लागली. ताईनं माझ्या समोरचं ताट उचललं व खरकटीं भांडीं गोळा करीत म्हटलं, " कोण रे ही मुलगी ? "

" ती ग, त्या रंगनाथाची. बँकेंत यावं तसा पैसे मागायला सतरांदा येतो. अन् पोरीला पाठवतो ! " मीं मोठ्यानं म्हटलं व बागेकडे नजर टाकली. माझा अवतार पाहून व आवाज ऐकून बेबी निघून गेली असावी. बरं झालं, पीडा

गेली, असं म्हणत मीं हात धुतले. कपडे केले. सायकलमध्यें हवा भरली आणि कॉलेजला निघालों.

पण बेबी रस्त्यावरच उभी होती. समोरच्या पानपट्टीच्या दुकानाजवळ नखं खात होती. तिच्या लोचटपणाचा मला अतोनात राग आला. मी कांहीं तरी संतापूनच म्हणणार होतों. पण ती अगदीं जवळ आली. सायकलची घंटा एकवार वाजवून खालीं पाहात हलकेंच म्हणाली,

" बाबा गांवाला गेले आहेत—घरभाडं थकलंय् नि रेशनिंगलाहि पैसे नाहींत. आई म्हणाली, कृपा करून पंधरा रुपये तरी द्या. पुढल्या सोमवारला नक्की परत देऊं. घेऊन येच—असं आई म्हणाली. ती वाट पाहात आहे—"

याच क्षणीं ती माझ्या आयुष्यांत डोकावली. बेबीच्या आईच्या—रंग-नाथाच्या पत्नीच्या—अस्तित्वाची जाणीव तेव्हां मला झाली. त्या स्त्रीला पाहिल्याचं आठवेना. ती कशी असावी, ही कल्पना करतां येईना. दुसरी बायको म्हणून ती तरुण, सुंदर असेल. कदाचित् मूर्ख, मोहांत फसलेली अगर अडलेली, गळयांत बांधलेलीहि असेल. विक्षिप्त नवऱ्याशीं, मृत सवतीच्या दोन मुलींशीं नि अठरा विश्वे दारिद्र्याशीं तडजोड करतांना—पण ती कशी असेल ह्याचा नक्की निर्णय मला घेतां घेईना. एवढं खरं कीं, मनांत अनिच्छा नि राग असूनहि " आईनें मागितले आहेत—" हे शब्द ऐकतांच मीं मुकाट्यानं पांचाच्या तीन नोटा खिशांतून काढून दिल्या व सायकलवर टांग मारली.

कां दिले मीं इतके पैसे ? कशाला दिले ? सायकल जरा पुढं जातांच माझं मन खडबडून जागं झालं व मलाच विचारूं लागलं. पांच पांच रुपयांच्या त्या तीन नोटा माझ्या डोळयांपुढं फडफडूं लागल्या. आंतल्या खिशांतलं रिकामं झालेलं पाकीट मला बोचूं लागलं. एवढे पैसे मीं कसे दिले ? परत कसे मिळणार ? स्वतःच्या दुबळया वर्तनाची मला चीड आली. माझ्या संवेदनाक्षम मनाचा प्रत्येकानं फायदा घ्यावा, ह्याचा राग आला. संस्कार तरी काय विचित्र असतात ! एक विवाहित स्त्री नाइलाजानं पैशासाठीं पदर पसरते हें पाहतांच मी पाझरून गेलों. बेबीला हाकलून दिलं, पण बेबीच्या आईला...

पुन्हां पैशाऐवजीं त्या न पाहिलेल्या स्त्रीचा विचार माझ्या मनांत वावरूं लागला. खरंच अडचणींत असेल ती ?—कीं रंगनाथसारखी निष्काळजी ? रंगनाथची पैसे मागण्याबद्दल फूस तर नसेल तिला ? कीं रंगनाथच्या मागें

ह्या व्यवहार तिनं केला ? मला कांहींच तर्क करतां येईना. मन अधिकच कडवट झालं.

कांहीं असलं तरी पूर्ण पंधरा रुपये मी गमावून बसलों होतों. माझ्या जन्मजात दुबळेपणामुळं व त्या अज्ञात बाईमुळं मनगटंसुद्धां चावणं शक्य नव्हतं. पैशाबद्दल विसरून रोजच्या व्यवहाराला लागणं भाग होतं. त्याच क्षणीं मला आठवलं कीं, सायकलच्या दोन्ही चाकांच्या टायर्स–ट्यूब्ज नव्या घेण्या-साठीं ते पैसे मीं राखून ठेवले होते. जुनाट टायर्स-ट्यूब्ज आतां अगदीं निकामी झाल्या होत्या. त्यांना पडणाऱ्या चिरा व भोकं लिंपतां लिंपतां मी हैराण झालों होतों. रोज चाकांत हवा भरावी लागे व रोज रखडत जावं लागे. आतां आजहि, पुढल्या सोमवारपर्यंत रखडावं लागणार, ह्या जाणिवेनं मी अगदींच मरगळून गेलों.

संध्याकाळीं कॉलेजांतून परततांना माझ्या मनांतून पंधरा रुपयांचा विचार नाहींसा झाला होता. प्रयोगशाळेंत नवीन बसवावयाच्या गॅसप्लँटनं माझं डोकं व्यापलं होतं. घराजवळच्या वळणावर मला बेबी दिसली. नखं चावीत भिंती-वरची डोंगरे बालामृताची: जाहिरात पाहात ती जात होती. मीहि माझ्याच नादांत हवा संपलेली सायकल रेटीत होतों. पण मला एकदम भास झाला कीं, बेबीला कुणी घाईनं म्हणत आहे, "काका येताहेत, त्यांना नमस्कार कर!" मी भानावर येऊन पाहतों तों बेबी जबरदस्तीनं हात जोडल्यासारखं करीत होती, आणि तिच्यामागं तिची आई होती.

त्या स्त्रीला तेव्हां मीं पहिल्यांदा पाहिलं. वाटलं कीं, पूर्वींहि हिला पाहिलं असावं. बेबीचं बोट धरून...धाकट्या पंगू मुलीला कडेवर घेऊन दारांत उभी असतांना...रंगनाथाच्या मागोमाग जातांना...कांहीं नीट आठवेना. पण आज तिला स्वतंत्रपणें अशी मीं प्रथम पाहिली. तरीहि एखाद्या सावलीसारखी वाटली ती. कदाचित् अमक्याची पत्नी, आई ह्या भावनेनं तिच्याबद्दल विशेष कल्पना मला करतां येईना. त्या भावनेमुळं मीं तिच्याकडे फारसं पाहिलं नाहीं. तीहि समोर पाहात माझ्या दृष्टिक्षेपांतून सटकली.

सायकलचं अवजड ओझं मीं घरांत ठेवून दिलं व कपडे बदलून स्वैंपाकघरांत ताई चहा करीत होती तिथें गेलों. ताईकडे पाहतांच मला रंगनाथाच्या बायकोची आठवण आली. एकवार वाटलं कीं पंधरा रुपयांचा हिशोब ताईला सांगून

टाकावा. पण पुन्हां त्या कळाहीन बाईचा चेहरा आठवला व वाटलं, कशाला उगाच ताईला सांगावं सारं ? सोमवार–मंगळवारीं पैसे मिळाले कीं, त्या स्त्रीचा पुन्हां संबंधहि येणार नाहीं. ताईला सांगितलं नि ताईनं त्या स्त्रीबद्दल आस्था दाखवली कीं, उगाच रंगनाथबरोबर त्याच्या बायकोचंहि खातं उघडलं जायचं. त्या स्त्रीचा फार काळ संबंध राहावा, तिची नि माझ्या ताईची ओळख व्हावी, ही कल्पनाच मीं झाडून टाकली व चहा पिऊं लागलों.

काय गंमत आहे ! रंगनाथला दर खेपेला मी उदक सोडल्यासारखे पैसे देत असें. पैसे परत येतील ही आशा ठेवत नसें व परतबोलीची तारीख तात्काळ विसरून जात असें. परंतु रंगनाथच्या पत्नीनें माझ्याकडून पंधरा रुपये घेतले आहेत व ती सोमवारीं परत करणार आहे ही गोष्ट मला घडींघडीं आठवत होती. असं कां व्हावं हें मला कळत नव्हतं. वैधव्यांत अतोनात हाल भोगलेल्या माझ्या ताईपासून तों अल्लड व हंसऱ्या अशा माझ्या भावी वधूपर्यंत अनेक तऱ्हेच्या स्त्रिया माझ्या परिचयाच्या होत्या. पण कुणा परिचित–अपरिचित स्त्रीला मीं कर्ज दिलं नव्हतं. तें दिल्याचा सूक्ष्म आनंद मला होत असावा. पण तसं म्हणावं तर त्या स्त्रीची आठवण कांहीं सुखदायक नव्हती. कदाचित् साय-कलचीं चाकं मला सोमवारची आठवण करून देत असावींत. पण चाकांनींहि हल्लीं तसा दगा दिला नव्हता. उलट त्याच टायर्स-ट्यूब्ज आणखी आठवडाभर दामटल्याबद्दल मला बरंच वाटायला हवं होतं. कांहीं असो, माझे डोळे कॅलेंडरवर व रस्त्यावर फिरत होते.

पण सोमवार उजाडायच्या आंतच ती स्त्री मला भेटली. रविवारीं संध्याकाळीं मी वाचनालयांतून परत येत होतों व वहाणेचा आंगठा तुटला होता म्हणून वळणावरच्या चांभारासमोर थांबलों होतों. तेव्हां रंगनाथची पत्नी माझ्या दिशेनें येतांना दिसली. प्रथम मीं तिला चटकन् ओळखलंच नाहीं. बेबी बरोबर नव्हती त्यामुळं खूण पटली नाहीं. पण माझ्याकडे पाहात ती माझ्यासमोरच घुटमळली, तेव्हां मीं तिला ओळखलं व एका पायांत वहाण घालून जरा तिच्या समोर सरकलों.

ओळखीचं क्षीण हास्य करीत ती माझ्या वहाण नसलेल्या पायाकडे पाहात होती व जुलमाच्या भेटींतली निरीच्छा लपवीत मी तिच्या चेहऱ्याकडे टक लावून होतों. लक्ष जावं, कुतूहल वाटावं, ओळख करून घ्यावी, असं तिच्या

चेहऱ्यांत कांहींच नव्हतं. श्रीमंती थाटमाट अगर कलागुणांचा डौल ह्या गोष्टी तिला पारख्या होत्याच. पण थोडी आकर्षकता वा सुदृढताहि तिच्यापाशीं नव्हती. मन थबकवणारी कुरूपता अगर मूढताहि तिच्या ठायीं नव्हती. कसलंच व्यक्तिमत्व जणूं तिला वर्ज्य होतं !...

"तुमचे पैसे—" अखेर ती वाट पाहून पुटपुटली. जणूं मलाच प्रथम बोलायचं होतं. पण मी लगेच म्हणालों,

"हो, उद्यां-परवांपर्यंत दिलेत तरी चालतील—"

"आज 'हे' आले आहेत—" ती एकदम मान वर करून म्हणाली. तिच्या डोळयांत आनंद वगैरे दिसला नाहीं. पण मीं आनंद दर्शवून म्हटलं,

"वा ! मग ठीक झालं ! रंगनाथकडून घेईन—"

"नको, नको ! तेवढ्यासाठींच सांगायला आलें. दुपारपासून तुम्हांला बघत होतें. ते सकाळींच आलेत. आतां झोपले आहेत—त्यांना कळवूं नका मीं पैसे घेतल्याचं. फार रागावतील ते—"

बोलतांना तिला धांप लागली व क्षणभर मजकडे आवर्जून पाहणारी तिची दृष्टि परत खालीं, दुसऱ्या—वहाण घातलेल्या—पायाकडे गेली. मला काय बोलावं, सुचेना. उद्यां पैसे मिळणार नाहींत ह्याचा खेद फारसा वाटला नाहीं. रंगनाथला नकळत तिनं माझ्याकडून कर्ज घेतलं आहे नि रंगनाथपासून तिला नि मलाहि तें लपवायचं आहे—ह्या सगळया भानगडीबद्दल मला कसंतरीच वाटलं.

"मी लवकर तुमचे पैसे परत देतें—त्यांना बोलूं नका—" चांभारानं दुरुस्त केलेली वहाण माझ्याकडे टाकतांच ती घाईनं म्हणाली व चालूं लागली. चांभाराचे पैसे द्यायला मीं खिशांतलं पाकीट काढलं. पंधरा रुपयांच्या नोटा ठेवलेला त्यांतला कप्पा अजून सपाट होता. मला झपझप जाणाऱ्या त्या बाईला ओरडून सांगावंसं वाटलं कीं, बाई, नकोत मला ते पैसे. पण नवऱ्याला कळवूं नका, त्याच्या नकळत देईन—असलं कांहीं मला नको. मला तुमचा संबंधच नको !

जीभ तुटल्यासारखा उभा राहून मी तिची नाहींशी होणारी आकृति पाहात होतों. मनांत येत होतं कीं आतां आमच्यांत एक सूक्ष्म, छपवण्यासारखं बंधन निर्माण झालं आहे...

काय दुर्दैव ! त्याच दिवशीं दिवेलागणीच्या वेळीं ती मला परत भेटली. बॅटरींत नवा मसाला भरण्यासाठीं मी बाजारच्या रस्त्यानं जात होतों, तेव्हां ते लोक बाजूच्या मिठाईच्या दुकानांतून बाहेर आले. बेबीनं मला पाहिलं व साद दिली. रंगनाथहि हंसला नि बेबीचं बोट पकडून रस्ता ओलांडूं लागला. त्य दोघांच्या मागून रंगनाथची पत्नी येऊं लागली.

"उज्जैनपर्यंत गेलोंच नाहीं. मुंबईला एक भानगड उपटली..." मिठाईनं तृप्त झालेला चेहरा फुलवीत रंगनाथची टकळी सुरू झाली. मी ऐकण्याचं सोंग करीत तें बिल्वपत्र पाहूं लागलों. विक्षिप्त कलासक्त नवरा, सख्खी आई नसलेली झडझडीत काळी पोर नि केवळ नांवाला मूल नि मंगळसूत्र असलेली ती स्त्री. माझी दृष्टि तिच्याकडे वळली व थबकली. ती नवऱ्याच्या मागं उभी राहून मला ओठ दाबून व डोळे बारके करून खुणावत होती—पैशाचं नवऱ्याजवळ बोलूं नका म्हणून सांगत होती.

एरवीं मी बोललों नसतोंच. पण तिनं खूण केली, म्हणून मी चुकून बोलून जायचा तें थांबवलं गेलं--हा जो नवा अर्थ आतां आला त्यानं मला अस्वस्थ वाटलं. इतकं कीं, सगळं बोलून टाकावं, संपवून टाकावं, अशी इच्छा झाली. पण तेवढ्यांत रंगनाथानं समारोप केला, "...असा झाला आमच्या ट्रिपचा फज्जा ! वेळ गेला नि दिडक्या गेल्या. बरं झालं, तुमचं देणं कंप्लीट चुकतं केलं तें अहो, नाहीं तर चारुदत्तासारखं व्हायचं. गणपतराव बोडस चारुदत्ताच्या त्या वाक्याला--" समारोपांतून दुसरं आख्यान लागणार होतं, पण मग त्याला कांहीं आठवण झाली. "हो, एका तालमीला जायचंय्--"

माझ्या ऋणांतून मुक्त झालेला रंगनाथ मिठाईची ढेकर देत निघून गेला. आणि त्याच्या मागून जाणाऱ्या त्याच्या पत्नीनं तिच्यांत नि माझ्यांत, तिच्या नवऱ्याच्या नकळत एक नातं निर्माण केलं. नको असलेलं, न सांगतां येण्यासारखं. त्याची तिला लाज वाटत असावी आणि मलाहि तें त्रास-दायक वाटत होतं. हलवायाच्या दुकानांतून बाहेर पडतांच मी दिसलों, तेव्हां तिच्या सावळट, भावनाशून्य चेहऱ्यावर चलबिचल झाली. शरमेनं रस्ता ओलांडून तिला नवऱ्यामागोमाग माझ्याकडे येववेना. आणि रंगनाथच्या रुंद पाठीआडून ती भररस्त्यावर हलकेंच मला खुणवीत होती, तेव्हां तिच्या खोल व

शुष्क डोळयांतहि सावल्या जमल्या. हें सारं मला उमगलं होतं नि म्हणूनच मी खिन्न होतों. असलं कांहीं मला नको होतं. नि तिलाहि नको होतं. दोघां-नाहि एकमेकांचा संबंध नको होता.

नंतर मात्र चारपांच दिवस मला रंगनाथ दिसला नाहीं, त्याची बायकोहि दिसली नाहीं अन् बेबीहि दिसली नाहीं. रंगनाथ दिसला नाहीं ह्यांत आश्चर्य नव्हतं नि त्याची बायको दिसली नाहीं हें बरेंच होतं. पण बेबी दिवसादिवसांत रस्त्यावर, समोरच्या वाड्यांत, आमच्या बागेंत दिसूं नये, ह्याचा मला विस्मय वाटला. बेबीच्या आठवणींपोटीं तिच्या आईची स्मृति तर लपली नव्हती?—पण तिच्या आईचा विचार मला उद्वेग आणणाराच होता. तिच्याबद्दल मला तसा रागहि नव्हता नि किमान दयाहि नव्हती. तरी बेबी गांवाला गेली असावी, आजारी असावी, अशा कल्पना मनांत येत. अन् बेबीबरोबर तिची न पाहिलेली पंगू बहीण उगाच दृष्टीपुढें येई.

एका सकाळीं दाढीचं सामान धुऊन कोरडं करीत मी बाहेरच्या व्हरांड्यांत उभा होतों, तेव्हां बेबी आणि तिची आई अचानक माझ्यासमोर उभ्या राहिल्या. क्षणभर मी दचकलों. बेबीबरोबर तिच्या आईनं यावं, माझ्या घरांत प्रवेश करण्याचं धारिष्ट्य दाखवावं, हें मला कसंसंच वाटलं. चोपलेल्या, दीनवाण्या मुलींच्या खांद्यावर हात देऊन भिकारणी दारीं उभ्या राहतात, त्याची मला आठवण झाली. पण ह्या बिचाऱ्यांना भिकारणी तरी कशाला म्हणायचं? अशाच एका सकाळीं रंगनाथ बेबीबरोबर आला होता व माझे पैसे परत करून गेला होता. ही पण त्यासाठीं आली असेल? कीं आणखी पैसे हवे आहेत हिला?

“ काय बेबी? इतके दिवस कुठं दिसली नाहींस?”

“ घरीं होतें—आई कामावर जात होती—” आईकडे वळून पाहात बेबी पुढं झाली. डावा हात पुढं करून तिनं मूठ उघडली. अडीच तीन रुपयांचा खुर्दा तळहाताच्या घामानें ओला झाला होता.

मी पाहातच राहिलों. तिच्या हातांतून पडतील, म्हणून पुढं होऊन ते पैसे घेतले. मोजूं लागलों. जुलमानं वसुली करणाऱ्या सावकारासारखं माझं मलाच वाटूं लागलं. आणि अशीच दोनतीन रुपायांनीं ही बाई फेड करीत राहणार, हें पाहून मी उद्विग्न झालों.

" आज एवढेच घ्या—मीरा आजारी आहे; नि आणिक पैसेहि मिळूं शकले नाहींत. विंचूरकरांच्या वाड्याच्या भिंती सारवण्याचं काम मिळालं, त्याचे हे पैसे... "

ती स्त्री बोलायचं थांबली व पैसे मोजायचं टाकून मी तिच्याकडे पाहूं लागलों. लोकांच्या घरांच्या भिंती सारवून हिला पैसे मिळवावे लागले. एकवार वाटलं कीं, हे तीन रुपये परत द्यावेत. माझा हात पुढं झाला व मग तसाच मागं झाला. भास झाला कीं, रस्त्यावर रंगनाथ उभा राहून तिच्या मागून खुणावीत आहे कीं पैसे देऊं नका तिला ! अस्वस्थपणें मीं म्हटलं,

" घाई कशाला केलीत इतकी ? "

" आधींच उशीर झाला आहे— "

" पण असले कष्ट कां उपसतां तुम्ही ?-- त्यापेक्षां रंगनाथला— "

" त्यांना तरी कुठं मिळतंय् कांहीं ?--अन् मिळतात त्याचा हिशोब त्यांना तरी लागतोय् का ?—कलावंत आहेत ना ते ! "

मी थबकलों. ह्या सुमार, कुरूप स्त्रीच्या हृदयांत नवऱ्याबद्दल प्रेम आहे कीं द्वेष आहे, हें पाहूं लागलों. मला कांहींच निर्णय घेतां येईना. नवऱ्याचा संसार तर ती नेटानं चालवूं पाहात होती ! मीं एकदम म्हटलं,

" धाकटी पाहिली नाहीं मी. आजारी असते काय ? "

" प्लास्टरमध्यें असते— "

मी कळवळलों व गप्प झालों. त्या स्त्रीकडे मला पाहवेना. पण तसं उभं राहणंहि विचित्र वाटलं. बेबी बाजूला ठेवलेल्या स्नोच्या बाटलीशीं खेळत होती, तिला म्हटलं,

" का ग, स्नो लावायचा काय ? बापासारखं नाटकांत काम करायचंय ना तुला ?— "

" नको— " म्हणत ती मागं सरली. व्हरांड्याबाहेर उभ्या असलेल्या आईला बिलगली. माझ्या मनांत विचार आला, तऱ्हेवाईक बापाबद्दल अपार भक्ति बाळगणाऱ्या ह्या पोरीला आपल्या सावत्र आईबद्दल काय वाटत असेल ? मीं मायलेकींकडे पाहात म्हटलं,

" चहा घेतां का ? "

" छे, छे— " ती बाई बेबीसकट मागं सरली. मलाहि असं विचारल्या-बद्दल विस्मय वाटला. मीं म्हटलं,

" ताई बाहेर गेली आहे— "

" हो, त्यांना जातांना पाहिलं-- "

म्हणून तर यायचं धारिष्ट्य नाहीं केलं हिनं ? ह्या व्यवहारांत तिच्या नवऱ्याप्रमाणं माझ्या बहिणीलाहि ही भीत असणारच ! तेवढ्यांत ती म्हणाली,

" आळींत कुणाशीं फारशी ओळख नाहीं. पण तुमच्या ताईची ओळख करून घ्यावीशी वाटते--"

" हो--पण ती उद्यांच तिच्या पुतणीकडे मुंबईला जाणार आहे. तीन आठवडे तरी येणार नाहीं..." ही स्त्री ताईकडे वारंवार बसायबोलायला, उधार मागायला येणार, ह्या कल्पनेनं मीं घाईनं सांगितलं. अन् वाटलं, ही आतां जाईल तर बरं !

" चल बेबी--"

" बरं आहे--"

व्हरांड्यांतून परततांना माझ्या मनांतली कणव वाळून गेली व कडवटपणा वाढूं लागला. दारिद्र्य मीं भोगलं नव्हतं, पण पाहिलं होतं. शास्त्रीय ज्ञानाच्या माझ्या व्यासंगांत दुसऱ्याला दान करायचं, दया दाखवावयाची इत्यादि बसत नव्हतं. खेरीज फारशी ओळख नसलेल्या स्त्रीशीं असला—कसलाच—व्यवहार करायचा, ही गोष्ट माझ्यावर झालेल्या संस्कारांत बसत नव्हती. तेवढ्यांत ताई बाजारांतून आली. मला जरा चपापल्यासारखं झालं. पण मग ताई आली, घरांत वावरूं लागली, अन् सगळं सावरल्यासारखं झालं.

दुसऱ्या दिवशीं पहाटेच्या गाडीला ताईला बसवून मी स्टेशनवरून रमतरमत घराकडे परतलों. स्टेशनवर चहा घेतला होता आणि ताई येईपर्यंत तीन आठवडे कॉलेजच्या क्लबांत जेवण घ्यायचा बेत ठरवला होता. साडेआठ-नऊला घरीं पोंचलों. पाहतों तों माझी वाट पाहात ती बाई—रंगनाथची पत्नी—व्हरांड्याशीं उभी होती !

मी थबकलों. बाहेरच थांबलों. आणि ती माझ्या घरांत व्हरांड्याच्या कठड्याला टेकून उभी होती. माझ्यासारखी तीहि अस्वस्थ, झांकळलेली झाली. घोगऱ्या स्वरांत म्हणाली,

" ताई गेल्या ? "

"हो," मीं उत्तर दिलं; पण तसाच उभा राहिलों. मी घरांत येईना ह्याचा अर्थ तिनं ओळखला. जागच्या जागीं तिनं हालचाल केली. मी पुढंच असल्यानें तिलाहि बाहेर होतां येईना.

एकदम ती म्हणाली, " जेवणार कुठं ?—तीनचार आठवडे ताई येणार नाहींत, असं काल म्हणालांत. म्हणून आलें मी ! "

माझ्या डोक्यांत फिरल्यासारखं झालं. आणि कडवटपणें, क्रुद्धपणेंच मीं म्हटलं, " पैसे आणलेत ? "

" नाहीं--" माझ्या चढत्या आवाजाला तिनं खालच्या खोल स्वरांत उत्तर दिलं. "पैसे मिळवण्याचे सर्व प्रयत्न फसले माझे. एक मार्ग आहे आतां-"

एक मार्ग, एक मार्ग-म्हणून आलें मी—माझ्या डोक्यांत सणक भरली. सल्फ्यूरिक ॲसिड् प्यायल्यासारखं मला झालं.

"--तीन एक आठवडे ताई नाहींत, तोंवर मी आपला स्वैंपाक करीन. मी ब्राह्मणाची नसलें तरी स्वैंपाक चांगला करीन. तुमच्या ताईसारखा ! अन्--अन् तुमचे पैसे फिटतील. "

माझे पाय भुईवर आले. पाप माझ्याच डोक्यांत आलं काय ? पापाचा विचार तिला शिवला नसेलच काय ? ताकद, तारुण्य, सौंदर्य कुठलीच गोष्ट तिच्याजवळ नसल्यानं ती श्रम करून उपकार फेडते आहे होय ? कीं मी सद्‌वर्तनी, सरळमार्गी आहें हें पहिल्यापासूनच पटल्यामुळं ती पैसे परत फेडायला, असे फेडायला, उत्सुक आहे ?

" एका दिवसाचे आठ आणे धरले, तरी सगळे पैसे फिटतील. रात्रीचा स्वैंपाक, संध्याकाळीं तुम्ही फिरायला जातां तेव्हां करून ठेवीन !-"

ती आशाळभूतपणें पाहात होती. मीं कपाळावरचा घाम पुसला व रुमाल उलगडून परत त्याची घडी घालूं लागलों. मला असे पैसे फेडून घेण्याची कल्पना कशीशीच वाटली. मुख्य म्हणजे मला पैसे हवे होते, पण तिचा स्वैंपाक नको होता. संबंध नको होता.

" हें पहा—" मीं विचार करून म्हटलें, " गांवांत माझी बहीण आहे, तिच्याकडे रोज जेवायला जायचं मीं आधींच कबूल केलेलं आहे. "—मीं सुटल्यासारखं तिच्याकडे पाहिलं व ती पेंचांत पडली.

"—मग दररोज चहा—खायला—"

" थँक्स !—मला अशी फेड करण्याची कल्पना आवडत नाहीं. "

" रुपयेच हवेत ? कुठून आणूं मी पैसे ? "

तिच्या आवाजांत तीव्र कंप आला व तिचा बेढब चेहरा अगदींच चमत्कारिक दिसूं लागला. सगळं संपवून टाकावं, ह्या उद्देशानं मीं म्हटलं,

" तुम्ही पैसे परत करण्याची घाई करूं नका. मला नड नाहीं एवढी. अजिबात परत करतां नाहीं आले, तरी हरकत नाहीं; पण—"

" छे–छे ! घाई केलीच पाहिजे मला. कर्जाचाच डाग फक्त आजवर लागला नाहीं. तेवढं तरी निर्मळ, स्वाभिमानाचं टिकूं दे ! "

एखाद्या पेटत्या निरंजनाकडे पाहावं तसं तिच्या नाडलेल्या आकृतीकडे मीं पाहिलं. ही काय सामान्य,शून्य व्यक्तिमत्वाची स्त्री म्हणायची ?—पण माझा निर्धार कायम होता. मी जवळच्या पामच्या कुंडीसारखा मख्ख उभा राहिलों...अन् मग ती निघून गेली.

उडी मारून मीं व्हरांड्यांत गेलों. कुलूप काढून घरांत शिरलों व एक चक्कर मारून परत व्हरांड्यांत आलों. आई-वडिलांच्या तसबिरी, एम्. एस्सी. डिग्रीचा कागद, कपाटांतले रसायनशास्त्रावरचे ग्रंथ मला माझ्या जगाची जाणीव करून देऊं लागले. ह्या व्हरांड्यांत मी माझ्या कमलला, उन्हाळयाच्या सुटींत येतों व मुहूर्ताचं ठरवतों म्हणून सांगून निरोप दिला होता. मागच्या महिन्यांत हिंगण्याच्या मुलींना भाऊबीजेची वर्गणी इथंच उभं राहून दिली होती. व्हरांड्यांत ठेवलेल्या सायकलीं त्या नव्या टायर्स-ट्यूब्ज तें पंधरा रुपये येण्यापूर्वी कालच चढविल्या होत्या...

आतां त्या उरलेल्या बारा रुपयांची मला धास्ती वाटूं लागली. त्यांची अजूनहि जरूरी होती. रंगनाथाला दिलेल्या कर्जापेक्षां ह्या पैशांची खात्री होती. पण ते कशा तऱ्हेनें परत येणार ह्याच्या कल्पनेंत मी कासावीस झालों. मोकळया घरांत माझं मन मोकाट सुटलं आणि प्रयोगशाळेंत जाण्याचा उत्साह मला येईना. एक प्रकारचं विचित्र दडपण मनावर आलं होतं. नको वाटणारं रहस्य माझ्यांत नि रंगनाथाच्या बायकोंत निर्माण झालं होतं. इतरांना कदाचित् सामान्य वाटणारं ! पण आम्हां दोघांनाहि त्रासदायक होणारं—छळणारं !

नंतरच्या तीन दिवसांत ती दिसली नाहीं. मध्येंच येणाऱ्या तिच्या आठवणीनं वेंधळं होणारं माझं मन दिवस जाऊं लागले तसं खूष होऊं लागलं. पैसे गेल्याचं एवढं नाहीं, पण ती उगाचच आयुष्यांत आली, आतां जाते आहे, हा विचार सुखदायक वाटला. बेबीचं बोट धरून रंगनाथ एकदां दारावरून गेला, तेव्हां मी जरा दचकलों. पण दोघं मजेंत होतीं व माझा जीव जाग्यावर आला. सगळं सामसूम होणार ह्याची खात्री झाली. निर्भर मनःस्थितींत मग मीं सायन्स कॉंग्रेससाठीं लेख लिहिण्यास सुरुवात केली व प्रयोगशाळेंत गुरफटूं लागलों. याच सुमारास तिची परत भेट झाली.

प्रयोगशाळेंतून बऱ्याच उशीरानं मी बाहेर पडलों. घरापाठीमागच्या एका पडक्या वाड्याजवळून नेहमींसारखा जाऊं लागलों. तेव्हां ती आपल्या प्लास्टरमधल्या मुलीला जुनाट बाबागाडींत ठेवून मोठ्या कष्टानं चालली होती. सहजच आम्हीं एकमेकांना पाहिलं, चेहेरे चुकवले व जवळ येतांच दोघंहि थबकलों.

सायकलवरून उतरत मीं म्हटलं, “ही ती तुमची मीरा ?”

“हो—माझी ! हीच तुम्हीं पाहायची राहिली होती—”

मला तिच्या कडवट बोलण्याचा राग आला. निघून जाणं वाईट दिसेल म्हणूनच मी थांबलों.

“तुम्हांला रोज जातांना मी पाहातें !” ती म्हणाली.

“असं ? मीं पाहिलं नाहीं तुम्हांला ! रोज येतां देवळांत ?”

“हल्लींच येतें. शेजारची जुनाट बाबागाडी जरा वेळ मिळते. मिरीला औषधपाणी बंद आहे, तेव्हां निदान अंगारा-दर्शन तरी मिळावं म्हणून ह्या देवळांत—” ती थांबली. बाबागाडी कोपऱ्याला ठेवून जवळच्या पिंपळपारावर टेकली. “इथं बसतें मग थोडा वेळ.”

मी त्या अर्धमृत मुलीकडे बघत होतों. त्या स्त्रीच्या दुर्भाग्याची नवींनवीं दालनं पाहात होतों. तिच्या दुःखी आयुष्यानं गलबलून तसाच उभा राहिलों होतों.

“तुमच्या पैशाचं मी विसरलें नाहीं.” ती माझ्याकडे पाहात अंमळशानें म्हणाली.

त्या विषयाची मला भीति होतीच. मीं एकदम म्हटलं,

" मी तर विसरूनहि गेलों. खरंच सांगतों, तुम्ही एवढं ऋण मानूं नका. हवं तर—हवी तर भाऊबीज माना—"

" ताईच्या शेजारीं मला कशाला उभी करतां ? त्या रूपवान् आहेत, कर्तृत्ववान आहेत."

" पण बहिणीला––"

" नको. ऋणावर नि पापावर पांघरुणं घालण्यासाठीं भाऊबहिणीच्या नात्याचीं ठिगळं लावणं मला पटतच नाहीं...तसं पाहिलं तर भाऊबहिणहि हल्लीं हिशोबांत चोख असतात–"

ह्या बिनतोड युक्तिवादावर मी काय बोलणार ? एवढंच म्हणूं शकलों, "तुम्ही बारा रुपयांचा फार बाऊ करतांय्. जरा रंगनाथासारखी वृत्ति ठेवा—"

" हो–तसं जमलं असतं तर फार बरं झालं असतं ! त्यांच्याशीं कांहींच जमत नाहीं माझं––"

ती अकस्मात् मनांतलं बोलूं लागली. माझंहि मन तिच्याबद्दलचा कडवटपणा, कंटाळा टाकून टक लावून ऐकूं लागलं. पण ती थांबलीच. मींच विचारलं,

" तुमचा त्याच्याशीं प्रेमविवाह झाला होता ना ? "

" तसंच नाहीं. मीं आपण होऊन लग्न केलं त्यांच्याशीं. तसा आज मला त्यांचा त्रास–तिटकारा वगैरे वाटत नाहीं. पण सगळं सांभाळणं जड जातं. अन् आतां कुठें मला जग म्हणजे काय, प्रेम म्हणजे काय, ह्याचा अंदाज येऊं लागला आहे !––"

क्षणकाल आम्ही दोघं मूक होतों. एकमेकांबद्दल अरुचि असलेलीं, एकमेकांत निर्माण झालेला पाश तोडूं पाहणारीं आम्ही त्या कातरवेळीं समोरासमोर स्तब्ध होतों. ती पारावर टेकलेली, मी सायकलचा आधार घेऊन. वेळ जात होता, लोक जात होते, पण आम्ही अकारण थांबलों होतों.

" तुम्हीं लग्न कसं नाहीं केलं अजून ?—" स्फोट व्हावा तसा अचानक तिचा आवाज आला. मी दचकलों. त्या आवाजानं, त्या प्रश्नानं दचकलों. हळूंच म्हणालों,

" करणार आहें. आमच्या कॉलेजांत डेमॉन्स्ट्रेटर होती मागल्या वर्षीं, तिच्याशीं ठरवलं आहे––"

"—वाटलंच मला ! " ती म्हणाली व उठली.

ती बाबागाडी, प्लास्टरमधली पांढुरकी पोर, ती मूढ दिसणारी पण गूढ वाटणारी स्त्री—ह्या लटांबराबरोबर जाण्याची मला लाज वाटली. अंधार होता व दिवा नव्हता तरी मी सायकलवर स्वार झालों व म्हटलं,

" जातों आतां. जायचंय एका ठिकाणीं. "

" जातां ? पुन्हा भेटाल तेव्हां पैसे देतां येतील अशी आशा करतें. "

" पुन्हा भेटाल तेव्हां पैशाचं बोलाल तर मी रागवेन. " मी नकळत बोलून गेलों व अंधारांत नाहींसा झालों...आपल्या आजारी सावत्र मुलीला घेऊन वाकलेली ती स्त्री संथपणें माझ्यामागं येत आहे, असा भास मला घरीं पोंचेपर्यंत होत होता...सारी रात्र मला तसलींच स्वप्नं पडत होतीं...

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच ती आली. स्टोव्हवर आधण ठेवून मी स्टोव्हच्या आवाजांत गात होतों, तेव्हां ती मूकपणें व्हरांडयांत येऊन बसली सहज माझं लक्ष गेलं व उकरून काढलेल्या पुतळ्यासारखी ती बसलेली पाहून मी हबकलों.

" तुम्ही ? "

" हो.-"

एकवार वाटलं, बारा रुपये, निदान तीन रुपये आले. संबंध संपत आले ! आधणांत पाणी टाकीत म्हटलं,

" चहा घेणार ? "

" हो—ताई उद्यां येणार ? "

" आज रात्रीं. "

चहा संपेपर्यंत आम्ही बोललों नाहीं. कप खालीं ठेवतांच ती म्हणाली,

" मुद्दामच आलें. "

" पैसे द्यायला ? "

" नाहीं ! पण कर्ज फिटलं हें सांगायला ! "

मला अर्थबोध होईना. मी गोंधळून पाहूं लागलों. तिचा सौम्य चेहेरा ढवळून निघाला. मग ती स्पष्टपणें म्हणाली,

" मी कसं कर्ज फेडणार तुमचं ? साधे बाराच रुपये; पण- रोजचं दूध, औषधं तोडूनहि मी ते जमवूं शकले नाहीं. खेरीज सवतीच्या मुलींना छळण्याचं पापाहे पदरीं येऊं लागलं-"

तिच्या बोलण्याचा, रडगाण्याचा मला वीट आला. माझी शांतता संपुष्टांत आली आणि मीं म्हटलं,

" कशाला सांगताय् सारं ? मीं पैसे परत द्या म्हटलं का ? विसरा—मलाच विसरा तुम्ही—"

" नाइलाजानं मी तुमच्या दारीं आलें. मला कळतं कीं तुमच्या आयुष्यांत मीं डोकावणं पाप आहे अन् माझ्या आयुष्यांत तुम्हीं प्रवेश करणं अपवित्र आहे. पण--पण अखेर मीं संपवलय् सारं--" बोलतां बोलतां ती थरथरली. " मीं काल रात्रीं त्यांना सांगितलं. तुमच्याकडून पैसे घेतले हें खोदून खोदून सांगितलं अन् त्यांचा संताप जागृत केला. दुसऱ्याच्या देण्याघेण्याबद्दल निष्काळजी असूनहि माझ्या कटकटींनें अखेर ते उखडले...गुरासारखा मार खाल्ला मीं ! सगळया अंगावर वळ उठले आहेत–"

मी तिच्याकडे, तिच्या तोंडाकडे, हातापायांकडे बावरून पाहूं लागलों. ती अर्धवट हसली. म्हणाली, " आतां देणं फिटलं तुमचं; नि त्यांचं ! म्हणूनच आलें, चहा घेतला..."

मला काय म्हणावं, कळेना. अशा वेळेला काय बोलायचं, मला ठाऊक नव्हतं. अभावितपणें मी उद्‌गारलों, " काय केलंत हें ? बारा रुपयांच्या मानानं फार किंमत दिलीत. अन् कां मारलं त्यानं ? मीं सांगितलं असतं त्याला समजावून ! संशय घेतलान् ?"

" नाहीं. माझ्यावर त्यांचा तसा विश्वास आहे. पण तुमच्यासारख्या देव-माणसाजवळ मीं मागायला जावं–"

" छे !–काय बोलतां हें ? " मी उठून उभा राहिलों. मला माझी सुखी परिस्थिति नि तिची भयंकर स्थिति--दोन्ही सहन होईनात. तीहि उठली व म्हणाली,

" हो—तुम्ही लोक देवमाणसासारखं होऊं पाहतां, वागतां ! अन् त्या प्रमाणांत आम्ही अधिकच हीनदीन होत जातों. संस्कारानं, परिस्थितीनं, सर्व तऱ्हेनं तुम्ही परिपूर्ण आहांत.–अन् आम्ही ? रिक्त लोक—कसं तुमचं ऋण विसरायचं ? कसं फेडायचं ? म्हणूनच आम्ही श्रम देतों, शरीरं देतों, प्रेम देतों ! पैसा कांहीं परत देऊं शकत नाहीं. मला तर कांहींच देणं शक्य नव्हतं. तुम्हीं स्वैंपाक करूं दिला नाहींत—शरीर द्यायला मला ना रूप ना बळ. अन्

प्रेम द्यायचं तर माझं मन आधींच विकलेलं अन् तुमचं हृदय दुसरीला अर्पण केलेलं ! खरं म्हणजे कांहीं शक्य असतं, तरी तसं घडलं नसतं. कारण पैसे घेतले तेव्हांच तुमच्याबद्दल मला अरुचि वाटूं लागली––"

ती थांबली व थरथरली. बाजूच्या सायकलला आधारासाठीं टेकली. वरून आलेल्या वेलीच्या फांदीला धरूं लागली. मी त्या उजळलेल्या स्त्रीकडं भ्रमिष्टा-सारखा पाहात होतों. ही कसली मूढ, कुरूप, रिकामी, शून्य?––मला तर तिच्याजवळ विशाल हृदयाचा, सनातन मूल्यांचा मोठा व अमोल ठेवा आहे ह्याची खात्री पटली.

मी माझ्या विचारांत असतांनाच ती हालली, कांहींतरी पुटपुटली व नमस्कार केल्यासारखं करून निघून गेली. व्हरांडा रिकामा झाल्याचं उमगतांच मीं शुद्धीवर आलों. तिच्या माझ्यांतलं गुप्त, विचित्र, अवघड व कांचणारं बंधन आतां तुटलं होतं. संपलं होतं !

आतां ती भेटणार नाहीं, बोलणार नाहीं असं वाटलं. एका तऱ्हेनं तें बरंच होतं अन् एका तऱ्हेनं वाईटहि होतं. अन् आतां ती दिसेनाशीहि होत होती. मीं तिचा नि माझा रिकामा कप उचलला. सायकलच्या दोन्ही चाकांतली हवा जावी तसं माझ्या दोन्ही खांद्यांतलं बळ गेलं व दिवसाउजेडीं मला अंधारं, रिकामं भासूं लागलं.

• • •

## . ३ .

# चलन

वारा प्यायलेल्या वासरासारखा हुंदडत आनंद बसस्टॉपपासून पुणें स्टेशनच्या इमारतीपर्यंत आला. त्याचं हृदय थरथरत होतं व रक्त सळसळत होतं. त्याच्या चालण्याच्या लगबगींत, परीटघडीच्या कपड्यांत व गालावरील पुटकुळयांत अधीरतेचं व प्रसन्नतेचं मिश्रण दिसत होतं. वयांत आलेलीं मुलं राज कपूरसारखे केस वळवतात, अवघड बोधवचनं तोंडांत घोळवतात, अन् रोज स्वप्नं पाहात असतात. आँणि आनंदाला तर नुकतंच विसावं वर्ष लागलं होतं. कॉलेजचं शिक्षण घेणाऱ्या, सुखवस्तु व सुसंस्कृत कुटुंबांतल्या मुलांच्या अंगीं असणारी निरागसता नि अवखळपणा त्याच्या अंगावर उमटलेला होता. त्यांतहि आजचा त्याचा नूर कांहीं औरच होता. आजचा आवेश, अस्वस्थता कांहीं वेगळंच सूचित करीत होती. आज कांहीं वेगळंच घडायचं होतं. तारुण्याचा अभिमान वाटेल असं. जीवनाला निराळा रंग चढेल असं !

स्टेशनांत शिरण्यापूर्वी आनंद थबकला व शीळ वाजवीत त्यानं एक गिरकी घेतली. समोरच्या दुकानांतून चॉकोलेट विकत घ्यावं कीं आंत जाऊन तिकिटं काढावींत ह्याचा त्याला निर्णय घ्यायचा होता. दोन्ही गोष्टी निकडीच्या होत्या व कुठलीहि गोष्ट मागाहून करणं कठीण होतं. गोंधळांत पडलेला आनंद तसाच उभा राहिला. अन् मग एकाएकीं त्याला सगळयाचंच हसूं आलं. खरं म्हणजे कुठल्याहि गोष्टीची तशी जरूरी नव्हती. कांहींहि केलं नाहीं, आज खंडाळयाची सफर केली नाहीं तरी त्याचं उषेवरचं प्रेम कमी होणार नव्हतं.

उषेची व त्याची दोन वर्षं दोस्ती होती. आणि दोघांनाहि परस्परांच्या प्रेमाबद्दल मनोमन खात्रीहि होती. घरांतले व बाहेरचे लोकहि त्यांचं लग्न होणार म्हणून उघड बोलत. अन् कधींतरी आपलं लग्न होणार हीहि खूणगांठ दोघांना

पटली होती. इतकं असल्यावर अद्याप 'मी तुझ्यावर प्रेम करतें' असं उषेनं म्हटलं नाहीं अगर 'माझ्याशीं लग्न करशील?' असं आनंदनं विचारलं नाहीं ह्याची रुखरुख कशाला बाळगायची? तरीपण आजकाल तशी रुखरुख उषेला व आनंदालाहि वाटूं लागली. वाटलं, कीं चारचौघांसारखं आपल्याहि प्रेमाला आतां शब्दरूप यावं. जें हृदयांत भरलं आहे, डोळयांत तरळत आहे व हालचालींत उमटत आहे तें आतां ओठांबाहेर पडावं. मात्र चारचौघांसारखं तें उपाहार-गृहाच्या लाकडी खोलींत, गल्लीबोळातल्या चोरट्या कोपऱ्यांत, दिवाणखान्यांतल्या अर्धवट घाईंत रुक्षपणं उरकलं जाऊं नये. आपल्या भव्य प्रीतीचा उच्चारहि तितक्याच पवित्र, सुंदर तऱ्हेनं व्हावा.

...'कुठेंतरी दूर, निवान्त जागीं जाऊं रे...जिथें माणसांचा नि घड्याळांचा पाहरा नसेल तिथें!' उषा आळोखेपिळोखे देत म्हणे. घरीं, बसमधें, कॉलेजांत गांठ होत असूनहि ती प्रदीर्घ भेटीसाठीं आतुर होती. 'कुठं जायचं? कशाला जायचं?' आनंद डोळा चुकवीत म्हणे...शहरांतलीं मैदानं, टेकड्या, बागा त्यांच्या डोळयांपुढून फिरत. विचार करीत तोहि मग म्हणे, 'खरंच जाऊंया. अगदीं दूर अन् सबंध दिवस!'

तो दिवस त्याच्या डोळयांपुढं साकार उभा राही व त्याचं अंग रोमांचित होई. उषेला तसंच कांहीं होई अन् मग तो विषय तसाच राहून जाई. पण अव्यक्त भावना आकार घेण्यासाठीं अधिकच आतुर होत. पुन्हा मुख्य मुद्दा टाळून निवान्त भेट घेण्याचीं बोलणीं होत. असं होतांहोतां अखेर रविवारचा सबंध दिवस खंडाळयाची वनश्री पाहात घालवण्याचं दोघांनीं ठरवलं. सहज म्हणून जरी सफरीला गेलों तरी तिथें आपण प्रीतीच्या, विवाहाच्या आणाभाका घ्यायच्या हें दोघांनींहि ओळखलं होतं, मनांत ठरवलं होतं...

गंमत म्हणून ठरवलेल्या आजच्या सहलीमागचा हेतु आनंदाला आठवला व तो हसतांहसतां एकदम गंभीर झाला. केवढी महत्त्वाची, उन्मादक अन् पवित्र घटना आज घडायची होती! त्याच्या कोवळया चेहऱ्यावर कांहीं वेगळंच तेज चढलं. वेळ चालला होता व स्टेशनच्या आवारांत गर्दी वाढत होती. उषा यायच्या आंत तिकिट काढून चॉकोलेटदेखील घेऊन ठेवायचं त्यानं ठरवलं. तिकिटाच्या खिडकीपाशीं एकदोन लोक होते. ते दूर होतांच तो धांवला. खिडकीच्या चौकोनांत तोंड घालून म्हणाला, "दोन खंडाळा–सेकंड क्लास."

" दोन पैसे द्या, शेठ ! " कोपऱ्यांत कुणीं केविलवाण्या स्वरांत पुटपु
खिशांतलं पाकीट धुंडाळणारा आनंद दचकला. इतक्या जवळून कोण
हें बघायची त्याला इच्छा झाली. पण खिडकींतला मास्तर तिकिटं चि
धरून चष्म्यावरून त्याच्याकडे पाहात होता. आनंदनं पाकिटांतली द
नोट काढून मास्तरला दिली व बाजूला दृष्टि फिरविली.

" शेठ–पैसा द्या गरिबाला ! " बाजूलाच फतकल घालून बसलेली
भिकारीण त्याच्या नजरेला नजर देऊन विनवणी करीत होती. तिनं तसं
बसावं व हटकावं ह्याचा त्याला राग आला. तो कांहींतरी बोलणार तोंच
घटना घडली. त्या भिकारणीनं आपला लुगड्याचा पदर जरा बाजूला
चोळी न ल्यालेला वक्षभाग जरा उघडा केला, अन् मग तसंच टक लावून,
कारुण्यानं म्हटलं, " शेठ... "

आनंद विलक्षण दचकला ! कांहींतरी अद्‌भुत, उन्मादक पाहिलं असं
न वाटलं तोंच त्याच्या गुडघ्यांत गोळे आले व अंगावर घाम उमट
तिकिटाला किती पैसे पडले व परत किती मिळाले ह्याचा बोध न होतां
मोड मोजूं लागला. फार गोंधळ होऊं लागला तेव्हां पैसे मुठींत घट्ट धरू
तिथून दूर सरूं लागला.

परंतु मघाशीं पूर्ण दर्शन दिलं नाहीं असं वाटून कीं काय, त्या भिका
पदर पुरा दूर केला व जरा हक्कानंच म्हटलं, " आतां तरी गरि
द्या कांहीं... "

आनंद पुन्हा दचकला. वाटलं कीं दोन आणे टाकावेत तिच्या पुढ
त्याचा हात पुढं झाला अन् मग विजेचा धक्का बसावा तसा मागं सरला.
आपलं अंग उघडं केलं, लज्जा दूर केली, म्हणून आपण बक्षिसी दिली
तर ठरणार नव्हतं ? ह्या विचारासरशीं आनंदच्या अंगावर काटा उठला.
पैसा देववेना व तिथून पायहि काढतां येईना. ह्या स्त्रीचं आपण देणं लागतों
भावना त्याला ग्रासूं लागली आणि दोन दिडक्यांसाठीं हिनं आपली अब्रू
करावी ह्याची खंत वाटली. उमलणारी कळी उन्हाच्या तिरिपीनं क
तसा त्याचा फुललेला कोवळा चेहरा काळवंडून गेला.

सैन्यांतले कांहीं अधिकारी वॉरंटचे कागद फडफडवीत तिकीटघराकडे

सावले तेव्हां आनंद तिथून दूर झाला व गर्दीमधून वाट काढीत दुसऱ्या टोकाला जाऊन उभा राहिला. तेवढ्यांत समोरून उषा आली.

× × ×

सिनेपोस्टरवरच्या चित्रचंद्रिकेसारखी उषा नटली होती.

जात्याच ती सुंदर होती; पण आज तिनं विशेष प्रसाधना केली होती. आजचा दिवस महत्त्वाचा आहे, परमसुखाचा आहे ह्या जाणीवेनं ती अन्तर्बाह्य मोहरून गेली होती. आनंद दृष्टीस पडतांच शक्य तितकं मुरडून व प्रेमार्द्रपणें पाहात ती त्याच्याकडे आवेगानं आली.

आनंद तिच्याकडे बघतच राहिला. तिनं इतका शृंगार केलेला त्यानं आजवर पाहिला नव्हता. सुंदर असली तरी साधी होती ती. कॉलेजमधें जायला लागूनहि ती नऊ वारी नेसत असे व पॉवडर लावीत नसे. पण आज तिनं खूपच नखरा केला होता. नखं रंगवलीं होतीं व ओठांवरून रंगाची कांडी फिरवली होती. दोन वेण्यांतलीं एक, फूल खोचून पाठीवर टाकली व दुसरी वक्षःस्थळावर रुळत ठेवली होती. तलम, गुलाबी, गोल पातळ ती नेसली होती व तसल्याच रंगाचा ब्लाऊझ तिनं घातला होता. ब्लाऊझला खांद्यावर फुगे आणले होते, गळया-जवळचा भाग मोठा केला होता आणि पोट उघडं टाकायची फॅशन केली होती. आनंदची दृष्टि तिच्या सर्वांगावरून फिरत उघड्या पोटावर स्थिरावली अन् त्याच्या छातींत धडधडलं!

"केव्हां आलास?...मला किती वेळ बसच मिळाली नाहीं. रिक्षा करून आलें शेवटीं. काढलीस तिकिटं?"

आनंदनं तिच्यापुढं हातांतलीं तिकिटं धरलीं अन् मग त्याच्या लक्षांत आलं, कीं आपण हळूच भिकारणीच्या दिशेला पाठ केली. त्याच्या डोळयांपुढं मघाचंच दृश्य परत तरळलं. वेडयासारखं त्यानं उषेकडे पाहिलं. उषा आपल्याच आनंदांत होती व विचारीत होती, "आंत जाऊंया?"

"जाऊंया."

मुद्दाम छाती पुढं काढीत व केसांच्या झुलुपांतून ऐटींत बोटं फिरवीत आनंद उषेसह फलाटावर आला. भिकारीण मागं राहिल्याचं समाधान त्याला लाभलं. उषेनंदेखील पदर नीट घेऊन पोट झाकावं असं त्याला वाटलं. समोरच उभं

असलेलं मवाल्यांचं टोळकं पाहतांच त्याला हें तीव्रतेनं वाटूं लागलं. ते लोक तिच्या पोटाकडे पाहात आहेत व त्यांच्या हंसण्यांत नाणीं फेकल्याचा आवाज येत आहे असा त्याला भास होऊं लागला. भरकटणारं मन सावरायचा प्रयत्न करीत तो फलाटाच्या दुसऱ्या टोकाला जाऊं लागला; पण फलाटावरचा प्रत्येक मनुष्य उषेकडे केवळ विकारी दृष्टीनंच पाहात आहे असं त्याला वाटूं लागलं.

...अन् मग फलाटच केवळ नाहीं, तर कॉलेजचं आवार, थिएटरें, हॉटेलें, मुलींच्या शाळा, त्याच्या नजरेपुढून जाऊं लागल्या. प्रत्येक ठिकाणीं विकारी, शिकारी डोळे तरुण स्त्रियांची पारध करीत होते. स्त्री दिसावी, तरुण स्त्री दिसावी, तिचं अंगोपांग नजरेस पडावं म्हणून छद्मीपणानं, भुकेल्या वृत्तीनं जागजागीं जो तो पुरुष वेध घेत होता. नेहमींच आढळणारीं दृश्यं आनंदला आतां वेगळया तऱ्हेनं दिसूं लागलीं, वेगळा अर्थ प्रतीत करून देऊं लागलीं. त्याचं सरळ, संवेदनक्षम मन हतबल झालं आणि उषेनं गुंतवलेलीं हाताचीं बोटं सोडवून तो थबकला.

" कां थांबलास ? मासिकं बघायचीं ? " उषा वाढत्या लाडिकपणानं म्हणाली व बाजूच्या व्हीलरच्या दुकानाकडें बघूं लागली. दोघंहि हळूहळू तिथें गेलीं. मोठ्या चेहऱ्यांच्या तरुण स्त्रियांचीं भडक चित्रं असलेलीं मासिकं ओळीनं मांडून ठेवलीं होतीं. पानापानावर तसलीं चित्रं असलेलीं सिनेमाचीं मासिकंहि त्यांत होतीं. त्यांत नसलेलीं, पण नाक्यानाक्यावर विकलीं जाणारीं उघड्या-वाघड्या बायांच्या चित्रांचीं चोपडीं आनंदच्या डोळयांपुढं आलीं. सगळीकडेच उघडीं अंगं, उघड विक्री ! पैसे टाकून तीं चित्रं घ्यायचीं, जास्त पैसे टाकून चित्रपट पाहायचे, आणिक जास्त पैसे टाकून...आपलं मन आवरण्यासाठीं आनंदनं घुंगरटीं उडवावींत तसे डोळयापुढून हात हालवले व म्हटलं, " कांहीं नवं नाहीं दिसत ! "

" तर काय ! " उषा त्याला ओढीत म्हणाली, " अन् आपण काय वाचणार का आहोंत तिथें ? " बोलतांना ती फिसकारून हसली व त्याला बिलगली. तिच्या हसण्यावागण्यांतला भाव त्याला भयंकर वाटला. ज्यासाठीं तो परवापासून उत्सुक होता त्याची त्याला एकदम अरुचि वाटूं लागली. उषेकडे तो विचित्र दृष्टीनं पाहूं लागला. जणू समोर मांडलेल्या रंगीत मुखड्याची कुणी तरुणी उषेच्या रूपानं पुढं आली होती. आणि–आणि फलाटा-

वरच्या मवाल्यांतलाच एक नीट कपडे घालून व सभ्यतेचा आव आणून आनंदच्या नांवानं तिच्यासमोर उभा होता. उषा मुरका मारून चाकोलेट मागत होती, म्हणून तो तिच्यासाठीं खिशांतल्या नोटा काढीत होता. तारुण्याचा सारा पिसारा उभारून ती साद घालीत होती म्हणून तो आपलं आयुष्य तिच्या स्वाधीन करायला झेप घेत होता!...

आनंदला वाटलं, कशाला जायचं खंडाळ्याला?—तारुण्याच्या कुरणांत नुकतंच अवखळपणें खेळूं लागलेलं त्याचं हृदय आतां भेदरलं, दुखावलं होतं. जगाच्या व्यवहाराची त्याला कल्पना नव्हती असं नाहीं. त्या चाकोरींत तो चारचौघांसारखं हळूहळू मिसळूनहि जात होता. चित्रं पाहात होता, चित्रपट पाहात होता, पोरीबाळींबद्दल चर्चा करूं लागला होता. पण आज त्याचं मन अकस्मात् हादरलं व गडगडत दुसऱ्या दिशेला गेलं. जग अखेर एकाच खुणेवर चालत आहे हें समजल्यानं त्याला थोडसं अपराध्यासारखं अन् बरचसं शिसारी आल्यासारखं झालं. वाटलं, कशाला ह्या भंपक, गलिच्छ जगांत आलों आपण? ह्यापेक्षां आईवडिलांच्या आधारानं, शाळेंत अगर तालमींत वेळ काढणं केवढं सुखाचं, सुरक्षिततेचं! वाढत्या वयाचा, मोठ्या जगाचा हाच एक दंडक आहे काय? तारुण्याचा, प्रेमाचा हाच अर्थ आहे काय? तसं असेल तर कशाला जायचं खंडाळ्याला?—

× × ×

गाडी खंडाळ्याच्या दिशेनं पळत होती. सेकंड क्लासच्या डब्यांतल्या एका कोपऱ्यांत आनंद—उषा एकमेकांना चिकटून बसलीं होतीं. समोर कांहीं निर्वासित सिंधी स्त्रिया बसल्या होत्या. साऱ्याजणी नेहमींप्रमाणं नटल्या होत्या व बडबडत होत्या. पलीकडे एक पंजाबी गलेलठ्ठ जोडपं बसलं होतं. एक तरुण इसम दारांतच उभा होता व दाढीवाला पाद्री कोपऱ्यांत वाचीत बसला होता. खडकी स्टेशन येतांच सैन्यांतला एक शिपाई आंत चढला.

गाडीच्या खडखडाटांतून व इतर प्रवाशांच्या गडबडींतून संधि मिळेल तशी उषा आनंदशीं बोलत होती. तिच्या आवाजांत, हावभावांत कमालीचं मार्दव आलं होतं. आनंद तितकासा खुलला नाहीं हें तिला खुपलं होतं. पण तो

बऱ्याच वेळां अबोल असतो हें माहीत असल्यानं तिला त्याचं विशेष वाटत नव्हतं. ती अखेर आनंदला असं बोलायला लावणार होती, कीं त्या शब्दांची रेकॉर्ड तिच्या हृदयांत अखंडपणें वाजत राहावी ! खूप खुशींत होती ती अन परीचे पंख लावून स्वर्गाच्या मुक्कामाला निघाली होती. आनंद तिला चिकटून तिच्यासह चालला होता, पण आधींच तो एका वेगळ्या विश्वांत गेला होता, नव्हे, आजवर भोवतीं असलेलं विश्व वितळून गेल्यानं खऱ्याखुऱ्या जगांत चाचपडत होता !

" खंडाळ्याला आपण अगदीं डोंगरांत जाऊं ! " उषा म्हणाली.

" हो " आनंद तिच्याकडे न पाहतांच चट्‌कन् उत्तरला.

" एवढे सँडविच् पुरतील; शिवाय मोठी केक आहेच ! "

" बरं. "

" तो दारांतला माणूस बघ कसा सारखा सिगरेटी ओढतोय् ! बरं झालं, तूं अजून सिगरेट ओढायला शिकला नाहींस — "

उषेनं खिडकीबाहेर तोंड काढलं व आनंद भकासपणें त्या दारांतल्या इसमाकडे बघूं लागला. सिगरेटच्या धुरांतून त्या इसमाचे डोळे विचित्र दिसत होते. ते डोळे पाहतांच आनंदला एका प्रख्यात विमा कंपनीच्या प्रमुखाची आठवण आली. आईच्या वाईट शीलामुळं त्याला कारकुनाची नोकरी मिळाली होती; आणि साध्या कारकुनाचा वरिष्ठ अधिकारी होण्यासाठीं त्यानं स्वतःच्या पत्नीला खर्चीं घातलं होतं. जें साधी भिकारीण करीत होती, तेंच त्या अधिकाऱ्यानं वेगळ्या रीतीनं केलं होतं. त्या इसमाचा कुठेंतरी ऐकलेला तो इतिहास आठवून आनंदानं डोळे मिटून घेतले.

...घायपाताच्या वनांतून गाडी वेगानं धांवत होती. डब्यांत सिगरेटचा धूर भरत होता व आनंद डब्यांतल्या पैखान्यांत लिहिलेल्या शिव्या विसरायचा यत्न करीत होता. त्याचं शरमलेलं, चुरगळलेलं हृदय आतां चिडीनं भरत होतं. आपल्या मनांतला सुप्त सूड, संडासांत लिहिणाऱ्या लोकांबद्दल चीड. दोनचार आण्यांच्या भिकेसाठीं नाहींतर दोनचारशें रुपयांच्या नोकरीसाठीं अब्रूचं चलन करणाऱ्यांबद्दल चीड. द्वेष, कीर्ति, सुख, साफल्य, वैचित्र्य — सारं मिळविण्यासाठीं लज्जेचं भांडवल करणाऱ्या आजच्या नीतीबद्दल चीड, आणि ह्या चाकोरींत संभावितपणें मिसळूं पाहणाऱ्या स्वतःबद्दल व उषेबद्दलहि चीड व तिटकारा !

" बोलत कां नाहींस ? " उषेनं त्याच्या दंडाला चिमटा काढीत म्हटलं.

" बोलतोय् ना ! काय बोलूं ? " आनंदानं कांहींतरी उत्तर दिलं. एकवार त्याला वाटलं, कीं आपली मनोव्यथा सांगावी. उषेला विचारावं, कीं जगाची ही कसली नीति ? कशाला त्या भिकारणीनं छाती उघडी केली आणि कशाला तूं पोट उघडं टाकते आहेस ? खंडाळ्याला आपण काय ठरवणार ? तुला चॉकोलेट देतों म्हणून तूं पोट उघडं टाकतेस तसं तुला जन्मभर अन्नवस्त्र देईन म्हणून...

आनंदानं दचकून उषेकडे पाहिलं. तिची निष्पाप, नाजूक चर्या पाहतांच त्याला स्वतःच्या विचारांची शरम वाटली. झटक्यासरशीं आपल्या मनांतील विचारांची अडगळ त्यानं खिडकीवाटें फेकून दिली. तिच्या अंगावर रेलत तो नव्या उत्साहानं म्हणाला, " त्या तीन सिंधी मुलींतली कोणती तुझ्यापेक्षां सुंदर आहे, सांग ! "

ही त्याची नेहमींची पद्धत उषेला ठाऊक होती. नाक मुरडून ती म्हणाली, " निदान सबंध सिंधी समाजांत माझ्याइतकी सुंदर मुलगी सांपडणार नाहीं. आनंद, तुला सिंधी लोकांबद्दल उगाचच कळवळा — "

" निर्वासित आहेत बिचारे ! " आनंदाला निर्वासितांबद्दलचा नेहमींच्या वादाचा विषय मिळाला.

तो पुढं बोलणार तोंच उषा उद्गारली, " निर्वासित कसले, पळून आलेले ! अन् ह्या बायांची करुणा कसली वाटायची ? पंजाबी स्त्रियांसारखे बलात्कार नाहीं झाले ह्यांच्यावर ! मला नाहीं सिंधी स्त्रियांची दया येत -- "

आनंदला एकदम जीभ तुटल्यासारखं झालं. उषा सहजच बोलली; पण आनंदाच्या हृदयावर नवा आघात झाला. सिंधी स्त्रियांच्यावर अत्याचार झाले असते, तर त्यांच्याबद्दल सहानुभूति वाटली असती. अत्याचार होणं थोडक्यांत टळलं ह्याचा आनंद मात्र वाटत नाहीं कुणाला. सूड घ्यायलाहि बलात्कार अन् सहानुभूति मिळवायलाहि बलात्कार ! दोन आण्यांसाठींहि बलात्कार अन् दोन राष्ट्रं घडवायलाहि बलात्कार ! बलात्कारावर, बेअब्रूवरच सारे व्यवहार, साऱ्या मापल्या जातात. अरेरे ! —

सावरलेल्या मनावर आनंदनें उसना उत्साह आणला तोहि असा ओघळून गेला आणि तो भ्रमिष्टासारखा त्या सिंधी स्त्रियांना चुकवून खिडकीबाहेर पाहूं

लागला. वारा पडला होता नि उंचसखल भागांतून गाडी वाट काढीत होती. वाभळीचीं तुरळक झाडं नि विजेचे मोठे खांब जवळ येत होते नि मागं जात होते. गाडीनं अनेक दृश्यें दाखविलीं नि मग निवडुंगासारख्या वाढणाऱ्या व रुक्ष दिसणाऱ्या निर्वासितांच्या झोपड्यांच्या ओळी एकसारख्या दिसूं लागल्या. गाडी हेलकावत, उसासे टाकत थांबली व पिंपरीला जाण्यासाठीं स्टेशनवर सिंधी कुटुंब कलकलत उतरलं व निघून गेलं.

गाडी पुन्हां सुरू झाली तेव्हां डब्यांत बरीच मोकळी जागा झाल्यासारखं वाटलं. त्याचा फायदा घेऊन आनंद उषेपासून जरा सरकून बसला. अकालीं प्रौढ झालेल्या माणसासारखा तो दिसत होता. मिसरूड फुटलेला व मुसमुसत्या तारुण्यांत प्रवेश केलेला, एका सुकुमार मुलीचा सहवास मिळवणारा व प्रीतिवचनांचा उच्चार करूं पाहणारा हाच का आनंद, असा प्रश्न पडावा इतका तो सुकलेला, रुष्ट झालेला दिसत होता. उषेचा उत्साह वाढतच होता. रोमांचांनीं लवलवत ती अनेक मधुर स्वप्नं उघड्या डोळ्यांनीं पाहात होती; अधीर झाली होती, अंगविक्षेप करीत होती. एखाद्या जीर्ण, थंड, दगडी मूर्तीपुढें सुंदर नर्तिकेनं नाच करावा तसं त्या दोघांना बघून वाटत होतं.

गाडी देहूरोडच्या दिशेनं जाऊं लागली; आनंदाचे विचार निर्वासितांच्या छावणींतून सैनिकांच्या छावणींत शिरूं लागले. तें पंजाबी कुटुंब व तो सैनिक देहूरोडलाच उतरणारसं दिसत होतं. पंजाबी इसम सैन्यांतला कोणी मोठा अधिकारी असावा, अन् तो सैनिक तर परवाच्या महायुद्धांत प्रत्यक्ष रणांगणावर जाऊन आला होता हें त्याच्या छातीवरील फितीमुळं स्पष्ट कळत होतं. दोघेहि कशासाठीं सैन्यांत गेले, लढायला सिद्ध झाले? देशाच्या, शांतीच्या रक्षणासाठीं कीं पोटासाठीं, पोरांबाळांसाठीं?—आनंद त्या दोघांकडे टकमकां पाहूं लागला. खिडकीबाहेर दिसणाऱ्या मैदानावर मोटारगाड्या, रणगाडे, युद्धोपयोगी सामानांचे गोठे दिसत होते. जणू युद्धाची जोरांत तयारी चालू होती. दारूगोळा जमवला जात होता, रंगरूट गोळा केले जात होते, कांहींतरी मोलाचं, मानाचं जतन करायचा आटापिटा मांडला होता.

आनंदच्या भिरभिरत्या डोळ्यांपुढं वाचल्या-ऐकलेल्या अनेक गोष्टी दिसूं लागल्या. दारुगोळ्याच्या माऱ्यापुढं सैनिकांना पाठवण्याच्या आधीं त्यांना बायका पुरवल्या जात होत्या. स्त्रियांच्या अब्रूशीं खेळ खेळून मगच त्यांना

मृत्यूशीं सामना द्यायला धाडलं जात होतं. बोटी भरून, आगगाड्या भरून मुली आणल्या जात होत्या व बळी जाणाऱ्या शिपायांना खेळणीं म्हणून वांटल्या जात होत्या. क्षणिक सुखासाठीं लज्जेचा होम करून मग खंदकांत, समुद्रांत, समोरासमोर, जगण्यामरण्याचा सामना लढला जात होता. बळी जाणाऱ्यांचीं खेळणीं. मरणाची भूल पडावी म्हणून लाच...लढाईंत जय मिळाल्यानंतर बेहोषींतले सैनिक शत्रुमुलखांत जात होते व प्रथम तिथल्या स्त्रियांची अब्रू लुटत होते. विजयाची पहिली निशाणी, शत्रूच्या सूडाचं मुख्य समाधान म्हणून स्त्रियांची विटंबना ! गांवंच्या गांवं, देशचा देश विटाळले जात होते...लढाईची सुरुवातहि स्त्रीच्या बेअब्रूनं नि लढाईची अखेरहि त्यानंच ! पुन्हां लढाई, पुन्हां सूड...जगभर, शतकांमागून शतकं हा क्रम, हा न्याय चालू होता. सुधारणेच्या सुरुवातीपासूनच स्त्रीच्या अशा चलनाला सुरुवात झाली होती. सगळाच डाव भयंकर होता; सारखा वाढत होता...

देहूरोड स्टेशन मागं पडलं, पण आनंदची उदासीनता उतरली नाहीं. एका भयाण, व्यापक जाणिवेनं तो अधिकच कासावीस झाला होता. कार्ल्याचीं लेणीं व रविवर्म्याचा छापखाना ह्यांच्या मधून गाडी जात होती. वारा जोरांत वाहात होता आणि सेकंडच्या डब्यांत पाद्री म्हातारा व आनंद-उषा ह्यांशिवाय आणिक कुणी उरलं नव्हतं. त्या धर्मगुरूला काय लाजायचं ह्या भावनेनं उषेच्या वृत्ति मोकळ्या झाल्या होत्या व हाताचा विळखा आनंदच्या भोंवतीं घालून ती त्याच्या खांद्यावर डोकं टेकून सुखावली होती. आनंद मूढपणें बसला होता; शुभ्र दाढी कुरवाळणाऱ्या पाद्र्याच्या हातांतल्या धर्मग्रंथाकडे केविलवाण्या नजरेनं पाहात होता.

× × ×

अनेक युगें चाललेली स्त्रीची विटंबना उमगून आनंदच्या हृदयाला रक्ताची सतत धार लागल्यासारखं झालं. जमीन नि जनावरासारखी स्त्रीची देवाण-घेवाण पुरातन कालापासून सुरू झाली आणि आतां तर किरकोळ सुखासाठींहि स्त्रीची लज्जा सहज मिळूं लागली. भिकारणीचा चेहरा फार वेगळं रूप धारण करून, विचित्र रंगांत वाढत जाऊन आनंदला आतां ठायींठायीं दिसूं लागला. उषेच्या ठिकाणीं, खंडाळ्याच्या स्टेशनांत, खंडाळा गांवांत, भोंवतालच्या डोंगरांत, वरती आभाळांत !

एम्प्रेस होटेलचा उंचवटा बाजूला टाकून दोघंहि आडवाटेला गेलीं. गवत तुडवून व दगड-गोटे चुकवून अनेक पाऊलवाटा गर्द झाडींत लपायला जात होत्या. गार वाऱ्याच्या झुळुका एकामागून एक येत होत्या व सर्वांगाला सुखाची संवेदना देत होत्या. जागजागीं लहानमोठीं झाडं वेली उभ्या होत्या, पक्ष्यांना व प्राण्यांना खेळवीत होत्या. अगदीं निराळं, शांत, गूढ वातावरण कायमचं भरून राहिलं होतं. दुखावलेला आनंद आधारासाठीं त्या वातावरणाकडे बघूं लागला.

" अखेर आपण आलों ! तूं नि मी. किती दिवस चाललं होतं कुठंतरी एकान्तांत जायचं म्हणून... " उषा हातांतल्या पिशवीला गिरकी देत म्हणाली.

' नको ! उषा, आपण परत जाऊं ! ' आनंदला म्हणावंसं वाटलं. त्याला एकान्ताची, निवान्त निसर्गाची जरुरी होती; परंतु प्रेमाच्या खेळाची, स्त्रीच्या शरीराची आतां आठवणसुद्धां नको होती.

" ...पण आधीं मला सांग, तूं नाखूष कां आहेस ? खोटं नको बोलूंस. तूं नेहमींसारखा खुलला नाहींस, बोलत नाहींस, हसत नाहींस. इकडे येण्यासाठीं तूं तर माझ्यापेक्षां आतुर होतास. काय झालंय तुला ? बरं नाहीं का वाटत ? कां घरीं कांहीं झालं ?...मला नाहीं सांगणार ? "

आनंदच्या हृदयाला पीळ पडला. ' काय सांगूं तुला, उषा ! ' त्याचं हृदय विव्हळलं. तिचा चेहरा किती निष्पाप, निरपराधी होता. एखाद्या अस्पष्ट, अभिजात कळीसारखी ती उमलत होती; आपल्याच नादांत स्वप्नांची पखरण घालीत होती. तिला कशाला दुखवायचं ? जगाच्या व्यवहाराची जाणीव कशाला करून द्यायची ?

" चल, वेडा कुठला ! मी खुलवतें तुला. चल ! " उषेनं त्याचा हात पकडला व समोरच्या वनश्रीकडे ओढलं. हां हां म्हणतां आनंदला आपण खुलवूं, पिंगा घालायला लावूं, याची तिला खात्री होती. एकदा आनंद रंगला कीं त्यासारखं दुसरं सौख्य नाहीं ! किती उजळून निघतो त्याचा चेहरा ! किती आवेशानं बोलतो तो ! साडीचा सोगा उचलून उषा त्याच्यासह धांवूं लागली आणि लाडिकपणें बडबडूं लागली.

" ही वाट कुठं जाते तें बघूं या आपण !...अय्या, पण ह्या शिंपल्या कशा आल्या इथें ? पूर्वीं इथें समुद्र होता कीं काय...इथल्या बंगल्यांची माहिती

आहे तुला ?... ह्या झाडाचं नांव सांग पाहूं ! हरलास ? अरे, हें कदंबाचं झाड ! हा कदंब, तो करंज, पलिकडचा पांगारा, मग तो पळस नि अंजन... किती दूर आलों आपण, नाहीं ? तो तिकडे मोठा दगड दिसतोय् तिथं बसायचं का... ? "

एका प्रशस्त शिलाखंडावर आनंद व उषा बसलीं होतीं. समोरच्या झाडाच्या शेंडयावरची रानपाखरांची जोडी आनंदच्या मनाला सांत्वनाची, प्रसन्नतेची उटी लावीत होती. चोहींकडे नजर टाकीत, शीळ वाजवीत आनंद मनाचा ताण कमी करीत होता. जरा वेळ गेला नि मग तो उषेला म्हणाला, " गप्प कां ? बोल ना कांहींतरी ! "

" मीच तर बोलतें आहे सारखी ! " आनंद आपणहून बोलला याचा तिला हर्ष झाला, " तूंच बोल ! आधीं सांग, कसला विचार करतोस ? काय आहे तुझ्या मनांत ? "

आनंद परत गप्प झाला. अन् तें पाहून उषेचा विरस झाला. तिच्या कपाळावर आठी उमटणार होती; पण अशी रागावून ती आजची सुवर्णसंधि सोडणार नव्हती. लाजल्यासारखं करीत ती म्हणाली, " मी सांगूं तूं इतका वेळ कसल्या नादांत होतास ?—तूं कसला विचार करीत होतास नि कसलीं दृश्यं पाहात होतास तें ? मला ठाऊक आहे. सांगूं मी ? "

आनंदनं शहारून उषेकडे पाहिलं. झाडवेलींच्या त्या निवान्त जागीं त्याला स्टेशनवरची गोंधळगर्दी दिसली व तो दचकला !

" मी पुण्याच्या स्टेशनवर भेटलें तुला, तेव्हां तूं चकित झालास ! " उषा दगडावरचं शेवाळं ओरबाडीत म्हणाली, " माझी वेषभूषा तुला आवडली. माझी थट्टा करतोस नेहमीं; पण मी खूप छान आहें हें तुला मनांत पटलं. अन् मग इतकी सुंदर, तुझ्यासाठीं नटलेली, तुझ्याबरोबर एक दिवस येणारी उषा रोजच, जन्मभर..." उषा थबकली. प्रेमाचा उच्चार कसा करावा, विवाहाचा विचार कसा सांगावा हें समजेना तिला ! " माझा विचार करीत होतास तूं, आनंद !—आपल्या प्रेमाचा !—हो ना ? शप्पथ, सांग रे—" आनंदचं अधोवदन पाहून ती व्याकुळ होऊन थांबली. तो कांहींच बोलेना तेव्हां घाबरली व त्याचं मनगट धरून म्हणाली, " असं नाहीं आनंद ? "

" उषा ! " आनंदच्या स्वरांत कंप होता व त्यानं एकदम उषेकडे पाहिलें. त्यांत अपराधी छटा होती. ती कावरीबावरी झाली व तें हेरून तो घाईनं म्हणाला, " माझं तुझ्यावर प्रेम आहे उषा–पण..." अन् त्यानं पुन्हां तोंड वळवलं.

उषेला जरा धीर आला; पण ती पुन्हां शंकाकुल झाली. आनंदचीं दोन्हीं मनगटं पकडून त्याच्याकडे पाहूं लागली. आनंदनं तिच्या नजरेला नजर दिली. ह्या निष्पाप...पण तिला सारं सांगावं असंच त्याला वाटलं. हिला खऱ्या जगाची जाणीव नको का व्हायला ? अन् आपलं शल्य आपल्या प्रेयसीजवळ सांगायचं नाहीं तर कुणाजवळ ?

" उषा, आज एका तरुण भिकारणीनं दोन आण्यांच्या दयेसाठीं..." आनंद घोगऱ्या स्वरांत सांगूं लागला. त्याचा आवाज जड झाला होता; पण मग तो स्पष्ट आवाजांत व स्पष्ट शब्दांत सांगूं लागला; अन् अखेरीस आवेशानं, संतापानं, तो मोठ्यानं बडबडूं लागला. भिकारणीची हकीगत, त्यानंतर प्रवासभर दिसलेलीं दृश्यं व सुचलेले विचार, जगाच्या व्यवहाराची जाणीव ! त्याच्या हृदयांतलं दुःख कमी होत होतं. जणू तो कबुलीजबाब देत होता. उषेला मोठी करायला, आपल्याबरोबर वागवायला पाहात होता.

उषा भारावून ऐकत होती. प्रथम तिला अगदीं विचित्र वाटलं, पण मग सारं पटलं. क्रूर श्वापदाची डरकाळी ऐकतांच हरणाचा लोळागोळा व्हावा तसं जें प्रथम झालं तें आनंदच्या शब्दांनीं दूर झालं. आनंदबद्दलचा तिचा आदर शतपटीनं वाढला. हॉकीच्या मैदानावर व वक्तृत्वसभेच्या व्यासपीठावर तळपणाऱ्या आनंदपेक्षां हा तळमळणारा व शुद्ध दिसणारा आनंद किती वेगळा, किती मोठा होता ! ' माझं तुझ्यावर प्रेम आहे. आपण असं निसर्गांत, दूर दोघांसाठीं घरकुल बांधूं ! ' असं त्यानं म्हटल्यावर तिला जो हर्ष होणार होता त्यापेक्षां ही त्याची अस्वस्थता व ती आपल्याजवळ सांगण्याचा प्रांजलपणा तिला अधिक आवडला.

त्याचं बोलणं थांबतांच ती म्हणाली, " खरं आहे, आनंद ! मलाहि हें जाणवतं. रस्त्यांत लोक मागाहून चालतात नि टिंगल करतात. कुणीतरी कांहीं लिहितं, सांगतं नि मन शरमतं. वाटतं, आमचं आयुष्य ह्यासाठींच का ?...आजच

रिक्षावाला म्हणाला 'पैसे कशाला देतां तुम्ही? गार्डीतनं आलांत तेंच —' मीं म्हटलं, 'पैसे देत नाहींच आतां; पण पोलिसाच्या ताब्यांत देतें!' आपण झगडलं पाहिजे, सुधारलं पाहिजे —"

"हो, सुधारलं पाहिजे!" आनंद म्हणाला, "त्यासाठींच तुझं प्रेम मला हवंय्!" आणि त्यानं उषेच्या कुशींत आपला श्रांत माथा लपवला.



## . ४ .

# अपत्यहीन

पहाट फुटायची वाट पाहात चक्रवाक पक्षी जागरण करतो व उषेच्या आगमनासह आपल्या सख्याचें स्वागत करतो. निष्पर्ण झाडावर कोकिळा भिरभिरतात व हिरव्या पालवीचा सुवास सुटतांच साद घालीत नाचूं लागतात. महिने महिने शुष्क राहिलेली सरिता मेघवर्षावानें दुथडी भरते, आवेगानें सागराशीं संगम करायला धांवत सुटते. परदेशीं गेलेल्या प्रियकराकडे पंचप्राण लावून बसलेली कुणी प्रेयसी विमानाच्या, बोटीच्या आवाजानें जागी होते आणि आपला जिवलग भेटतांच स्वर्ग हातीं आल्याचें सुख मिळविते.

ही झाली विरहिणींची, परोपरीनें प्रेम करणाऱ्या कामिनींची कथा. त्यांचे भोग नि त्यांचें भाग्य !—भागिरथीलाहि असलाच वनवास सोसावा लागतो; आणि त्यानंतर असंच स्वर्गसुख लाभतं. परंतु तिच्या प्रेमाची, आयुष्याची तऱ्हाच कांहीं आगळी. कवींनीं कवनं करावींत, समवयस्क स्त्रियांनीं असूया बाळगावी असं तिच्या जीवनांत कौतुकाचं कांहींच नव्हतं. उलट तिच्या माहितींतले लोक तिची कींव करीत; तिच्या भाबड्या व कदाचित् दुष्ट वर्तना-बद्दल तुच्छताहि दर्शवीत. भागिरथीला सारं समजत असूनहि ती तिकडे दुर्लक्ष करी. आपल्या प्रियकराची, पतीची वाट पाहात दिवसचे दिवस, महिनेच्या महिने काढी. आणि तो भेटतांच, तिच्याकडे येतांच, बहरून जाई.

पुण्यापासून पांच मैलांवर असलेल्या बिबव्याच्या वाडीजवळ भागिरथी झोपडी बांधून राहिली होती. आसपासच्या बागांतून भाजीपाला गोळा करून ती रोज शहरांत धाडीत असे. तिचा दोन्ही कानांनीं ठार बहिरा असलेला भाऊ पहाटे सायकलला भाजी बांधून घेई व शहरांत येऊन कॉलेजच्या वसति-गृहांत पोचती करी. रोजचा भाजीपाला कॉलेजच्या क्लबांना पुरवायचं कंत्राट

भागिरथीनं घेतलं होतं. क्लबांना लागणाऱ्या केरसुण्या, पत्रावळी नि दूधदुभतं, देखील तिला पुरवतां आलं असतं. क्लब चालविणाऱ्या महाराजाजवळ तिचा तेवढा वशिला होता. पण अधिक पैसा मिळवायची अगर धंदा वाढवायची तिची इच्छा नव्हती. भाजीपाल्याच्या रतिबाचा मिळणारा पैसा भावाच्या नि स्वतःच्या पोटाला पुरतो ह्यांतच ती समाधानी होती. तिच्या बहिऱ्या, खुळ्या भावाला लग्न करायचं नव्हतं नि तिला लग्न होऊनहि एकाकी रहावं लागलं होतं. त्या दुर्दैवी भावंडांना तेवढी कमाई पुरेशी होती.

महिना सुरू झाला कीं कधींतरी भागिरथी स्वतः शहरांत जाई. पुण्यास जाणं तिला आवडत नसे...दौलतरावाची बायको म्हणून लफ्फेदार लुगडं नेसून पुण्यांतल्या पेठांतून ती पूर्वीं हिंडली होती. पुणें शहर पाहायला मामांच्या बरोबर ती अगदीं पहिल्यानें आली होती. तेव्हां तिला दौलती दिसला होता. त्याच्या दर्शनानें ती दिपून गेली. त्याच्या ओळखीसाठीं ती आसावून गेली. मंडईंत, चतुःशृंगीवर, चित्रपटगृहापाशीं तिनें त्याची चोरून नि चारचौघांत गांठ घेतली. त्याच पुणें शहरांत तिला प्रेमाचा साक्षात्कार झाला. मामामामींच्या मागें लागून तिनें दौलतरावाशीं लग्न लावलें. पुण्यांतल्या सर्वात मोठ्या लक्ष्मी रोडवरून तिची वरात वाजतगाजत गेली. तिचं भव्य, दिव्य प्रेम सफल झालं व तिनं त्याच्यासह संसार थाटला. लढाई सुरू झाली आणि तिच्या पायगुणांनीं गरीब दौलतीला कंत्राटं मिळत गेलीं. मिलिटरीसाठीं तो विटा पुरवूं लागला, बराकी बांधूं लागला. भागिरथीच्या कपाळीचं कुंकूं मोठं होऊं लागलं व कमरेला दागिन्याच्या पेटीची किल्ली खुळखुळूं लागली.

दौलतराव दारू पीत असे. कधीं तमाशालाहि जात असे. पण भागिरथीचं त्याच्यावरचं प्रेम वाढतच गेलं. त्याच्या पैशामुळेंच केवळ नव्हे, तर त्याच्या धिप्पाड देहामुळें. त्याच्या विशिष्ट वागण्यामुळें. खरं म्हणजे न सांगतां येणाऱ्या कारणांमुळें! भागिरथी दिवसेंदिवस त्याच्यावर अधिकच लोभावूं लागली व त्याच्या प्रेमाशिवाय जगणं अशक्य आहे हें तिला अधिकाधिक पटूं लागलें.

पण सात आठ वर्षं संसारसुख भोगल्यावर भागिरथीला पुणें शहर सोडावं लागलं. नवऱ्याचीं व्यसनं, उधळपट्टी, मारहाण तिनें एक वेळ सहन केली असती. पण त्यानें सवत आणावी—राजरोस लग्न करून सवत आणावी--हें तिला सहन होण्यासारखं नव्हतं. त्याच्यावरील अपार प्रेमामुळें सवतीलाहि

तिनें सामावून घेतलं असतं. पण पहिल्या बायकोला घरांत ठेवणार असाल तर नांदणार नाहीं ह्या बोलीवरच सवतीनें बाशिंग बांधलं होतं. सवतीचा गृहप्रवेश झाला नि त्या आधींच भागिरथी पुण्यांतून परागंदा झाली. बिबव्याच्या वाडीला भावासहित राहून भाजीचा व्यापार करूं लागली...

पुण्यांत पाऊल टाकतांना भागिरथीच्या डोळ्यांपुढें ह्या साऱ्या घडामोडी येत आणि तिचं हृदय झाकळून जाई. परोपरीचं प्रेम करणारं तिचं जखमी हृदय अनेक स्मृतींनीं अधिकच रक्तबंबाळ होई. मालवाहू मोटरचा कुठें आवाज आला तर ती गाडी दौलतीची असेल ह्या कल्पनेनं ती दचकून बघे. रस्त्याच्या कडेची एखादी नवी इमारत दौलतीच्या हातची तर नसेल ह्या विचारानें ती व्याकुळ होई. चुकून कुठें तो नजरेस पडतो का ह्या भावनेनें ती भिरीभिरी पाही. वारंवार तिला वाटे कीं, घराजवळ जाऊन त्याला बघावं. अगर तो कुठें कामाला असेल तिथें जावं. पण तिचं मानी मन माघार घेई. उलट कुणी ओळखीचं भेटूं नये म्हणून ती गांवाबाहेरच्या वाटेनें वसतिगृहाकडे जाई. महाराजाला भेटून भाजीचा हिशेब करी. आणि तशीच लगोलग वाडींत परत येई.

महाराज मोठा लाघवी होता. सैन्यांतल्या भटारखान्यांत तो पूर्वीं कामाला होता व तेथें दौलतीची व त्याची ओळख झाली होती. त्याला दौलतीची माहिती होती व भागिरथीच्या दुःखाचीहि कल्पना होती. भागिरथी हिशेब करून जाऊं लागली कीं, तो म्हणे, "थांब कीं बाई !—आलीस इतक्या लांब तशी जेवून तरी जा—"

"नको हो, खरंच नको—" भागिरथी म्हणे, "घरीं भाऊ वाट पाहात असेल—"

"ठाऊक आहे, काय भावाचं एवढं प्रेम आहे तें. जेवेल स्वतः भाकरी करून—"

"पण कशाला—"

"पण नाहीं नि बिण नाहीं. पन्नास पोरं जेवून जातात. तुझा काय भार एवढा ? बघ तर खरं आमचं फूड—"

मग भागिरथी थांबत असे. तिला आपल्या मूढ भावाबद्दल आस्था नसे. कुणाबद्दल तिला कळवळा वाटत नसे. फक्त पतीबद्दल...त्याचीच कांहीं बातमी ऐकायला मिळेल म्हणून ती थांबत असे. विद्यार्थ्यांच्या पंगती भराभर जेवून

गेल्या कीं महाराज तिला मागल्या व्हरांडयांत वाढी. उंबरठ्याआड आपलं ताट घेऊन गप्पा मारीत दोघं भोजन करीत.

एक दिवस महाराज तिला म्हणाला, " भागिरथीबाई, आपली इतक्या दिवसांची ओळख म्हणून बोलतों हं. मला तुझं नवल वाटतं. दौलूरावाची तूं आठवण उगाळत कशाला रहातेस ? त्यानं तुला घराबाहेर काढलं—"

" काढलं नाहीं, मीच निघालें—" भागिरथी पटकन् म्हणाली. आपल्या व्यंगावर कुणी बोट ठेवणं तिला मानवण्यासारखं नव्हतं. " महाराज, मीच बिवव्याच्या वाडीवर रहायला गेलें. त्यानं सवत आणली तर कशाला आपण रहायचं ? करूं दे तिला सुखाचा संसार. आठ वरसं मीं बी केला कीं–"

तिच्या ह्या बोलण्यामुळें, विशेषतः तिच्या आवाजांतल्या धारेमुळें महाराज मूक राहिला. भागिरथीला ती स्तब्धताहि रुचली नाहीं. आपल्याला कुणी हिणवूं नये असं जसं वाटलं तसं आपल्या दुर्दैवाला शब्दरूप यावं अशीहि इच्छा तिला झाली. ती मग म्हणाली,

" अन् समजा, काढलं घराबाहेर तर काय एवढं जगावेगळं केलं त्यांत ?— एवढा थोरला पैसा केला त्यांनीं लडाईंत, त्येला वारस नको कुणी ? मी अशी वांझ ! आठ वर्सांत मला मूल होईना—"

" आठ वर्षांत झालं नाहीं मूल म्हणून काय झालं ? बारा बारा वर्षांनीं पोरं होतात बायांना. अन् काय एवढी संपत्ती वाया चाललीय् त्याची ?— अग भागिरथीबाई, मनावर घेतलंस तर तूं देखील त्याच्या एवढा पैका करशील ! कशाला त्याची भिजास बाळगतेस ?—"

महाराज तळमळून म्हणाला व आमटीचे भुरके मारूं लागला. भागिरथीनें सुस्कारा सोडला व ताट पुढें सारलें. तिला पैसा मिळवून नवऱ्याची बरोबरी करायची नव्हती. तसं पाहिलं तर तिला अपत्याचीहि ओढ लागलेली नव्हती. पण महाराजाचं म्हणणं तिच्या हृदयावर फुंकर घालून गेलं. तिला वाटलं कीं, नवऱ्यानं नांदवलं असतं तर वर्षासहा महिन्यांत मूल झालंहि असतं आपल्याला !

महाराजानें तिच्याकडे थबकून पाहिलं. पंचवीस वर्षांची, भरल्या अंगाची व यौवनाचा सारा संभार अजून वागवणारी भागिरथी पाहून प्रथमच त्याच्या मनांत अभिलाषा उत्पन्न झाली. तिचं म्लान मुख व तिच्या दृष्टींत दिसणारं दैन्य पाहून त्याला अनुकंपा वाटली. एकदम तो उद्‌गारला,

" जेव भागिरथीबाई, जेव नि जिवाचे हाल नको करूं ! खेळेल मूल तुझ्या अंगावर. मी तर म्हणतों कीं, नवऱ्याचा नक्षा उतरवण्यासाठीं तूं पण दुसरं लग्न कर. तुझ्या कडेवर पोर पाहिलं कीं नाक खालीं होईल त्याचं—"

बोलणं थांबवून त्यानें हळूंच तिच्याकडे पाहिलं. त्याला वाटलं कीं आपलं म्हणणं भागिरथीला थोडसं जरी रुचलं तर...पण भागिरथी लाल पडली. मोठे डोळे करीत म्हणाली,

" छी–छी. काय बोलतां महाराज ! त्यांच्याशिवाय मला कुनीबी नको. त्यांनीं डागलं, टाकलं तरी त्यांच्यावरची माझी माया कमी व्हायची नाहीं. पुन्हां असलं वाकडं नगा बोलूं महाराज—"

भागिरथी बिबव्याच्या वाडीला परतली. भाऊ न जेवतां उपाशी राहिला म्हणून त्याला अद्वातद्वा बोलली व अळवाच्या खांचेजवळच्या दगडावर बसून रडरड रडली. आपल्या आयुष्याचे काय काय धिंडवडे होणार हें तिला कळेनासें झालें. मतलवी लोकांना चार हात दूर ठेवण्याइतकी अक्कल अन् ताकद तिच्यांत होती. महाराजाच्या सूचनेचं तिला एवढं वाटलं नाहीं. पण ज्या नवऱ्यामुळें हे भोग वांट्याला आले आहेत त्याच्यावर आपण उलट उत्कट प्रेम करीत राहतों ह्याचंच तिला दुःख झालं. नवऱ्याच्या नांवानें, त्याच्या संपत्तीच्या नांवानें, सवतीच्या नांवानें तिनें बोटं मोडलीं. अन् पुन्हां नवऱ्याच्या ओढीनें ती वेडीपिशी झाली.

आठवडे उलटले आणि कॉलेजच्या संमेलनासाठीं बरीचशी भाजी व फळं पोचवायचं काम आलं. भावाबरोबर सायकलवरून भाजी व केळींचे घड पुढें पाठवून भागिरथी स्वतः फळांचा हारा घेऊन निघाली. दर पंधरवड्यानें ती गांवांत जात असेच. कधींमधीं महाराजाच्या आग्रहावरून मेसमध्यें जेवतहि असे. पण महाराजानें तिच्या आयुष्याबद्दल आजकाल बोलणं काढण्याचा धीर केला नाहीं. भागिरथीलाहि ती कर्मकटकट नको वाटे. पतीवरचं आपलं प्रेम शब्दानेंसुद्धां डागळूं नये असं तिला वाटे व आपली ओढ मनांतच आंवरीत ती शून्यपणें पुण्याहून परते. आजहि अशाच विचारानें ती बिबवेवाडीहून निघाली व वसतिगृहांत दाखल झाली.

महाराज गर्दीत होता. दोन नव्या आचाऱ्यांशीं वाद घालण्यांत गुंतला होता. गल्ल्याजवळ फळांची करंडी देऊन भागिरथी परतूं लागली. पण तेवढ्यांत

महाराजानें तिला पाहिलें. नाकांत तपकीर सरकावीत तो पुढें सरसावला. जेवणघराच्या बाहेर त्यानें भागिरथीला गांठली व म्हटलें, " हें काय-चाललीस व्हय लगेच !—"

" हो. फळं दिलीं मोजून मारुतीजवळ. अन् जेवायचा आग्रह नको करूं बाबा. आज तर उपास आहे मला. देवालाहि जायचंय् अजून—"

" उपास कशाबद्दल ग ?—दौलतीला मूल होणार म्हणून कीं काय ?—"

महाराजाचे ते शब्द ऐकतांच भागिरथी चमकली. तिची काया थरथरली. ती कांहीं म्हणणार एवढ्यांत महाराजच पुढें बोलला, " हो-कालच दोघांना पाहिलं मीं. तुझ्या नवऱ्याला नि सवतीला. तीनचार महिन्यांत दौलती बाप होणार. अखेर वारस येणार त्याच्या इस्टेटीला--"

केळीच्या सालीवरून घसरावं तसा भागिरथीच्या मनाचा तोल गेला. तिचं डोकं भणभणलं व डोळ्यापुढं अंधेर पसरला.

भागिरथी भकासपणें घरीं परतली व अळवाजवळच्या दगडावर बसून राहिली. भाऊ कॉलेजांत जेवायला थांबला होता व भागिरथीला जेवायची शुद्ध नव्हती. तिला भूक भासेना नि अश्रू येईनात. शून्यपणें ती नुसती बसून राहिली होती. वारसासाठीं, पुत्रासाठीं दौलतीनं दुसरं लग्न केलं होतं व कधीं-तरी लवकरच त्याला मूल होणं क्रमप्राप्त होतं. हें सारं माहीत असूनहि भागिरथी हतबुद्ध झाली होती. मुलाच्या आगमनानें जणूं तिच्या आशेचा अखेरचा तंतू तुटून जाणार होता. आपल्या अपरंपार प्रेमामुळें दौलती कधीं काळीं आपल्याकडे येईल अशी तिला आशा वाटे. पण आतां सारं संपणार होतं. मुलाला खेळवण्यांत, वाढवण्यांत दौलती कायमचा गर्क होणार होता. ती वांझ होती, परित्यक्ता होती, पण प्रियकरापासून आतां कायमची दुरावणार होती.

अंधार पडूं लागला आणि गोरंमोरं झालेलं भागिरथीचं तोंड काळवंडून जाऊं लागलं. रात्रीच्या आकाशगंगेसह तिच्या आसवांचा पूर लोटला. संसार सोडल्यानंतर आज प्रथमच तिनें इतका शोक केला. संपली, सारी आशा संपली. आयुष्यांत आतां कांहीं अर्थ उरला नाहीं, ह्या भावनेनं तिनं दुसरा दिवस पाहिला.

भागिरथीनें पुण्याला जायचें कायमचेंच टाकलें. आठ पंधरा दिवसांनीं

महाराजाचा निरोप येई पण ती जायचं टाळीत असे. भावाबरोबरच हिशेब पाठवीत असे व पैशांतले घोटाळे मुकाट्यानें सोशीत असे. पुण्यास गेलों अन् न जाणों कांहीं बातमी कळली अगर सवत दिसली तर जीव नको होईल ह्या भावनेनें ती वाडीबाहेर पडेना. सारा दिवस ती घरींच बसून राही. मनांत नाहीं नाहीं ते विचार येत...सासूबाईनीं डोहाळजेवणाचा काय बेत केला असेल, नवऱ्याकडून मित्रमंडळी जेवण उकळतील, बाळंतपण कुठं होईल, मुलाचं नांव काय ठेवतील, मुलगाच होईल का, अन् झाला तर तो कुणासारखा दिसेल, त्याच्या भोंवतीं नवरा किती नाचत राहील...नाहीं नाहीं ते विचार! दिवसभर नवऱ्याच्या घरांत होणारा आनंदसोहळा उघडया डोळ्यापुढें दिसत राही व रात्र पडली कीं पाळण्यांत रडणारं मूल तिला डोळा लागूं देत नसे.

एके दिवशीं अपरात्रीं तर ती तराळून उठली. नवऱ्याचं तें मूल रांगत रांगत तिच्याकडे येत आहे असा स्पष्ट भास तिला झाला. गादीवरून ती दूर झाली व साप अंगावर यावा तशी मागें सरकली. साप नव्हता, पण सावली मात्र उमटली होती. खिडकीपाशीं कुणी माणूस उभं होतं. हलक्या आवाजांत तिला हांका मारीत होतं.

भागिरथी प्रथम घाबरली. पण तिनें तो आवाज ओळखला. बेशुद्धावस्थेंतहि तिला तो स्वर ऐकूं आला असता. तिचं सर्वांग रोमांचित झालं. क्षणभर तिचा विश्वास बसेना. क्षणमात्र तिला कांहीं सुचेना. पण मग ती वेगानें दाराशीं गेली. कवाड उघडून अपुऱ्या उजेडांत पाहात म्हणाली,

"धनी—तुम्ही?—–"

"हो, मी, दौलती. आंत येऊं दे मला."

त्याच्या तोंडाला दारूचा वास येत होता. सवतीच्या सर्वस्वीं आधीन नव्हता झाला म्हणायचा! भागिरथीला त्याचा हात धरावासा वाटला. पण ती एकदम उद्गारली,

"कशापायीं आलांत?—–बारशाचं बोलवायला व्हय?"

"भलतंच बडबडूं नको. बारशाला अजून तीन महिनं आहेत—"

"मग काय हवं?—अशा अपरात्रीं ह्या कपाळकरंटीची सय आली—"

"असं काय करतेस? तुझी सय नेहमींच येते. तूंच चिडून भेटायचं टाळतेस. आज अखेर पांच मैल पळत आलों—–" तिला जवळ घेत, घरतां

ढकलत, दौलती म्हणाला. आंत येतांच त्यानें दार बंद केलं व कोट काढला. भागिरथी वेड्यासारखी त्याच्याकडे पाहात होती. त्याच्या येण्याचं, वागण्याचं तिला अजून आश्चर्य वाटत होतं. आणि तो अचानक लाभला ह्याचा आनंद ओसंडतच होता. रुमालानें वारा घेत तो जवळ आला, तशी ती दूर सरली. म्हणाली,

" कशाला ? मी वांझ आहें. तुम्हांला वारस हवा—"

" कां दुःखावर डागण्या देतेस ? पोर हवं म्हणून आईबापांच्यासाठीं ती बया पत्करली. पण प्रेम हवं म्हणून तूं...असं नको करूं. आज दोन चार महिने मला सुख लाभलं नाहीं."

तो पुढें होणार तेवढ्यांत पलीकडे पसरलेला भाऊ दचकून उठला. चोर आलाय् ह्या भीतीनें त्याची बोबडी वळली. भागिरथीनें झटकन् त्याचं बकोट धरलं. " धनी आल्याती. बोंबलूं नको—" म्हणून त्याला खुणेनं सांगितलं व मागल्या दारांतून परसूंत ढकललं. दार लावून घेतलं व ती दौलतीकडे धांवली...

त्या क्षणापासून भागिरथीचें आयुष्य पार बदलून गेलं. सवतीला दिवस गेले आणि भागिरथीला सोन्याचे दिवस दिसूं लागले. सवतीचा हेवा करण्याऐवजीं, द्वेष करण्याऐवजीं, तिला ती एक इष्टापत्तीच वाटली. घरीं सुख मिळेना म्हणून का होईना, तिचा नवरा तिच्याकडे येऊं लागला ! प्रियकरानें पांच सहा मैलाचा मार्ग काटून अंधेऱ्या वेळीं भेट घेण्यासाठीं धांवत यायचं ह्यासारखं जगांत दुसरं सुख तें कोणतं ? संध्याकाळचं कंत्राटावरचं काम आटोपल्यावर नवटाक झोकून, कधीं ट्रकमधून तर कधीं चालत दौलती येई व दारावर धडक मारी. मार्गप्रतीक्षा करणाऱ्या भागिरथीपुढें स्वर्ग साकार होई. परोपरीनें ती त्याची सेवा करी. आपल्या उत्कट प्रीतीचा पूर्ण वर्षाव त्याच्यावर करी. पहाटे तो परतला कीं आनंदाच्या गुंगींत ती सारा दिवस दवडी.

भागिरथी बदलली, बहरली. पहाटे उठून भाजी आणण्याचं कामहि आतां ती करीत नसे. भावालाच सारं करावं लागे. त्याच्याच गळ्यांत सगळा धंदा बांधून त्याला वेगळं बिऱ्हाड थाटून द्यायचा तिचा बेत होता. दिवसाआड दौलती येई आणि त्या खुळ्या भावाची गादी मागच्या पडवींत जाई. त्यापेक्षां

भावानें स्वतःचं आयुष्य सुरू करणं इष्ट होतं. त्याचं कुणाशीं तरी लग्न लावून द्यायचाहि तिचा बेत होता. भागिरथीचे आतां अनेक नवे नवे बेत होते. लफ्फेदार लुगडं नेसून मुद्दाम ती पुण्याच्या मंडईतून व लक्ष्मी रोडवरून जाई. कुणी ओळखीची बाई भेटली कीं मुद्दाम बोले. कुणी सासरचं माणूस दिसलं कीं छद्मी हंसे. तिचं गुपित आणि तिचा आनंद तिलाच ठाऊक. तिच्या जगावेगळया भाग्याचा अंदाज इतरांना कुठून येणार ? महाराजहि चकित होऊन म्हणे,

" भागिरथीबाई, आजकाल मोठी खुशींत असतेस तूं. कामांत तर तुझं लक्षहि नसतं. भाऊ कांहींतरी भाजी आणतो. पण तुला त्याचं कांहीं नाहीं. कसला एवढा विचार करतेस ?—"

" विचार कसचा ? " ती हंसून म्हणे, " विचार संपलाय् आतां—"

महाराजाला उमज पडत नसे. सवतीला पोर होणार ह्या जाणिवेनें भागिरथीनें नवऱ्याचं नांव अखेर टाकून दिलेलं असावं व आयुष्य मजेंत घालवायचं ठरवलेलं असावं असं त्याला वाटे व अभिलाषेचे अंकुर त्याच्या मनांत फुटूं लागत. पण तिनं कदाचित् कुणी सवंगडी शोधला असावा असा तिच्या वर्तनावरून त्याला संशय येई व तो उदास होई.

एक दिवस तो तिची वाट पाहात राहिला व ती येतांच म्हणाला, " दौलतीला मुलगा झाला. काल रात्रीं. गवळी सांगत होता आज पहाटेचा. आतां दौल्र कायमचा..." भागिरथी थबकली. क्षणमात्र तिला कांहीं सुचेना. अनेक विकल्प मनांत येऊन गेले. पण मग स्वतःला सांवरीत ती म्हणाली, " मग पेढे हवेत असंच ना ? हा घ्या रुपाया. मागवा आत्तां पेढे — "

असंच मन मारून नि वरकरणी हंसरा चेहरा करून रात्रीं दौलतीजवळ पेढे मागायचे असं ठरवून ती पुण्याहून परतली. सारा दिवस कसाबसा संपवून रात्रीं दौलतीची वाट पाहूं लागली. पण दौलती आला नाहीं. मध्यरात्रीपर्यंत ती खिडकींत उभी होती. दौलतीच्या सांवलीला शोधीत होती. ढगांच्या, झाडांच्या सावल्या डोळयाआड करीत होती. पण दौलती आला नाहीं !... त्या रात्रीं आला नाहीं नि पुढें कुठल्याहि रात्रीं आला नाहीं.

भागिरथीला कांहीं समजेना. सुचेना. नवरा गडबडींत असेल, बारशानंतर येऊं लागेल, ह्या कल्पनेनें तिनें दहा बारा दिवस दवडले. पण पंधरवडा गेला तरी

दौलतीचा पत्ता नव्हता. मग मात्र ती व्याकुळ झाली. वर्षभर सहवास घडलेल्या सवतीपासून तिनें त्याला ओढून घेतलें होतें, पण दहा पंधरा दिवसाचा हा नवा जीव आपलं सुख हिरावून नेतो हें पाहून ती विद्ध झाली. आपला पति पोरांत इतका रमलेला पाहून तिला खेद झाला. तिला पोराबाळाबद्दल प्रेम नव्हतें; वात्सल्याची भावनाच कमी होती. आपल्या नवऱ्यानं आपल्या प्रेमाला विसरून वात्सल्याच्या आहारीं जावं हें तिला विचित्र वाटलं. ती त्याच्यावर चिडली. त्याच्यासाठीं वेडीपिशी झाली. पण तो पुन्हां दुरावला तो दुरावलाच.

भांबावलेल्या मनानें भागिरथीनें कांहीं काळ वाट पाहिली व मग तिनें नवऱ्याचा नाद सोडून दिला. रात्रींची जागत न बसतां ती परत पहांटेची उठूं लागली. भावानें भाजीच्या धंद्यांत बरीच खोट आणली होती. भागिरथी परत जातीनें सारी खरेदी करूं लागली व हिशेब मांडूं लागली. दर आठ-वड्याला ती पुण्यास जाई. महाराजांची भेट घेई. पै–पैशासाठीं भांडे. जेवायला आग्रह झाला तर कधीं जेवे. नाहींतर तुटक उत्तरं देऊन माघारी येई. तिच्या वागण्यांतला कठोरपणा, कडवटपणा वाढत होता.

महाराज तिच्या लहरीकडे लक्षपूर्वक पाहात होता. अशीच कधीं ती खूष असली कीं तो खडा टाकणार होता. एकदां तर तो म्हणाला, " भागिरथी, मी महिन्याची रजा घ्यावी म्हणतोंय्. कंटाळा आला ह्या कामाचा. कसलंच सुख नाहीं. कुठं शांत जागीं जावं म्हणतोंय्. तुझी वाडी कशी काय आहे ग ?—"

" अहो ––आमचा कसचा उकिरडा —" त्याचा आशय उमगून भागिरथी बोलली. तो उलटून कांहीं बोलला नाहीं नि तीहि त्याला उडवल्याचा आनंद मानीत घरीं परतली. पण घरांतला एकाकीपणा पाहून तिला वाटलं, काय हरकत आहे ? दौलती आतां पुरा दुरावला. पोराचं प्रेम कांहीं न्यारंच असतं म्हणे ! पोराला टाळून आतां कसचा येतो तो ! मग आपण तरी प्रेमाची स्मरणी कशाला ओढीत रहायचं ? –त्यापेक्षां...

तिला आपल्या भावनांची शरम वाटली. दौलतीशिवाय दुसऱ्या पुरुषाचा विचारहि शिवणं शक्य नव्हतं तिला. मग असं कसं झालं ? नवऱ्यावरची आपली माया विटाळणार ह्या विचारानें ती भयभीत झाली. तिला अन्न गोड लागेना अन् दिवस डोईवरून जाईना. सारा दिवस कपाळाला हात लावून ती दौलतीला, दैवाला दोष देत बसून राहिली.

त्या रात्रीं दौलती आला! जणूं तिचा धांवा ऐकून, दुःख पाहून धांवून आला. पूर्वीसारखाच अंधार पडल्यावर आला व विस्मयानें विद्ध झालेल्या भागिरथीकडे पाहून हंसूं लागला. हळूंच म्हणाला, " मी, दौलती, आंत येऊं दे मला... "

त्याच्या तोंडाला दारूचा वास येत होता. पोराच्या दुधासाठीं तो सगळे पैसे उडवीत नव्हता तर! त्याचं मनगट पकडून ती म्हणाली,

" कशापायीं आलांती? बायकोपोराला टाकून– "

" बायको नि पोर आहेतच घरीं. अन् आतां आणिक एक व्हायचंय्. म्हणून तर आलों. काय करणार?-–"

तिच्यासकट तो आंत आला. त्याच्या आगमनानें नि स्पर्शानें ती सारें दैन्य विसरली व प्रीतिभावनेनें भरून गेली. मूल झाल्यावर तो तिला सोडून गेला व कित्येक महिने परत आला नाहीं म्हणून त्याला बोल लावायचं ती विसरून गेली. तिला त्या मुलाची आठवणच आली नाहीं. उलट सवतीला दुसरं मूल होणार, अन् तोंवर आपला नवरा, आपला दौलती आपल्याला मिळणार ह्या जाणिवेनें तिचें घर, तिचें मन उजळून गेलें. पुढचं दार बंद करून तिनें नवऱ्याचा कोट उतरवला व भावाची गादी ओसरीवर टाकून मागचं दार लावून घेतलं.

त्या रात्रींपासून पुन्हां भागिरथीच्या आयुष्याला अर्थ प्राप्त झाला. तिला तिचा दुरावलेला प्रियकर पुन्हां एकवार भेटला. ती वहरली. परत अंगानें भरूं लागली. तिला अन्न गोड लागूं लागलं व रात्री अपुऱ्या वाटूं लागल्या. चोरट्या भेटीच्या व उत्कट प्रणयाच्या शतधारांनीं ती न्हाऊन निघूं लागली.

परंतु ह्या खेपेस भागिरथी अगदींच भान विसरली नाहीं. सवतीपासून सुख मिळत नाहीं म्हणून आपला पति इथें येतो हें विसरून चालणार नव्हतं. उद्यां एकदां सवतीला मूल झालं कीं दौलती भेट घ्यायला यायचं टाकील; आत्ता कितीहि कबूल केलं, लोभ लावला, वचनं दिलीं तरी टाकील हें ती ओळखून होती. इतकं करण्याइतकं त्याचं प्रेम मोठं नव्हतं. तसं असतं तर त्यानें वारसासाठीं दुसरी सोयरीक केलीच नसती. अपत्यहीन प्रियकरणीची आनंदानें साथ केली असती. पण तो तसा नव्हता. अन् तिला मात्र त्याच्याशिवाय–तो असा असूनहि त्याच्याशिवाय--सारं जग तुच्छ होतं. हें सारं ध्यानीं धरून ती वागत होती.

पहाटे उठत होती व क्लबाकडे पाठवायची भाजी भावाच्या स्वाधीन करीत होती. दहा पंधरा दिवसांकांठीं गांवांत जाऊन हिशेबठिशेब पाहात होती. दररोज सकाळीं दौलती परतला कीं सुखाचा एकएक दिवस वजा करीत होती.

अखेर सुखाचे सगळे दिवस उणे झाले आणि एका खिन्न रात्रींपासून दौलती यायचा बंद झाला. भागिरथीनें रात्रभर त्याची वाट पाहिली, पुढले दोन चार दिवस वाट पाहिली, मग तिनें ओळखलं कीं त्याला मूल झालं! त्याच्या घरांत आनंदाचा आणिक एकवार गजर झाला. त्याचा संसार वाढला. त्या गोकुळांत तो गुरफटला गेला. मोकळया झालेल्या सवतीभोंवतीं तो गोंडा घोळूं लागला. तिनें हृदयांत उसळणारी दुःखाची कळ दाबली व भाजीचे हिशेब मांडायला सुरवात केली.

दिवस लोटूं लागले व कपाळाला आंठी घालून भागिरथी कामांत गढूं लागली. कधीं ती लफ्फेदार शालू नेसे व आपल्या खुळया भावाला खरपूस भाकऱ्या भाजून खायला घाली. मध्येंच तिला शंका येई, ती उठे व कॉलेजकडे जाई. महाराजाशीं भाजीबद्दल वाद घाले. तिचे असे उन्हपावसाचे खेळ पाहून महाराज दबून गेला होता. मनांत तो जें वागवत होता तें त्यानें आतां काढून टाकलें आणि त्यानें तशीच कांहीं सूचना केली असती तर भागिरथी स्पष्ट सांगणारच होती. आपलं गुपित, आपल्या परित्यक्त जीवनांत सुरू झालेली प्रणयाची विचित्र कहाणी कुणाजवळ तरी सांगायला ती उत्सुक होतीच. सारे ती सांगणार होती; अन् वर पुस्ती जोडणार होती कीं, 'सवतीला आतां लवकरच दिवस जातील. अन् मग आयुष्य असह्य होऊन माझा सखा अपरात्रींचा माझ्याकडे सारी वाट तुडवून येईल. म्हणेल, मी, दौलती, आंत येऊं दे मला—'

तिचं सारं मन त्या भेटीकडे लागलें होतें. तिचे सारे विचार सवतीच्या तिसऱ्या अपत्याविषयीं चालले होते. दिवस जात तसतशी ती अधिकच अधिरी होई. सवतीची कूस पुन्हां उजवली जावी म्हणून नवस करी. कुणाकुणाला गांठून मंत्रतंत्र करी. पुन्हां दिवस मोजी, भावाशीं भांडे, त्याचें अंथरूण उगाचच मागल्या परसूंत घाली. पुण्यांत रोज खेपा करी. सवत दिसते का म्हणून देवळं शोधी, ओळखीच्या बायांकडे आडून विचारपूस करी.

तो येणार ह्याबद्दल तिला शंका नव्हती. स्वतःच्या वांझपणाइतकीच सवतीच्या सुफलिततेबद्दल तिची खात्री झालेली होती. आपल्या विचित्र

आयुष्यावर व उत्कट प्रेमावर तिचा सारखाच विश्वास होता. म्हणूनच एका रात्रीं दारावर थाप पडलेली ऐकतांच ती दचकली नाहीं. तिनें दार उघडलें व दौलती कांहीं बोलण्यापूर्वीच त्याला आंत घेऊन त्याचा कोट उतरवला. भाऊ हल्लीं बाहेरच निजत असे. भागिरथीनें दोन्हीं दारं बंद केलीं. पुन्हां कांहीं महिन्यांसाठीं आपल्या प्रीतीचीं कवाडं उघडलीं...

—असलं हें भागिरथीला लाभणारं सुख, स्वर्ग. आणि असा तिला सोसावा लागणारा विरह, वनवास! तिचा प्रियकर अचानक येतो अन् एकाएकी निघून जातो. घरीं सुख मिळणं अशक्य झालं कीं साहस करतो व भागिरथीकडे धांव घेतो. आपल्या प्रेमाच्या वर्षावानें भागिरथी त्याला धन्य करते व तो गेला कीं पुन्हां त्याच्या परतण्याची वेळ मांडीत बसते. आपल्या संसारावर निखारे ठेवणाऱ्या सवतीची कूस सुफलित व्हावी म्हणून ती देवदेवक करते. दर वर्षा दीड वर्षांनीं तिची प्रार्थना फळाला येते. पुन्हां पुन्हां सवतीच्या संसारांत पाळणा हालतो आणि पुन्हां पुन्हां बिबव्याच्या वाडींत रात्री रंगतात. सासरीं व वाडींत ज्यांना ज्यांना हें ठाऊक झालं आहे त्यांना कींव येते, किळसहि वाटते. भागिरथीच्या भाबड्या स्वभावाबद्दल कींव, आणि तिच्या दुष्ट वर्तनाबद्दल किळस! भागिरथीला सारं समजतं. पण इतरांच्या कुजबुजीशीं तिला कर्तव्य नसतं. परोपरीचं प्रेम करणाऱ्या स्त्रीवर कुठलेहि आरोप झाले तरी तिला मिळतील तितके प्रीतीचे क्षण लुटायचे असतात. भागिरथी त्यासाठीं वाट पाहते. नवस करते. स्वतःचा संसार वा स्वतःचं अपत्य ह्यांची तिची ओढ कधींच आटली आहे. स्वतःचा संसार नको, मूल तर मुळींच नको, अशीच तिची भावना झालेली आहे. आणि सवतीचा संसार सजावा व सवतीची कूस वरचेवर उजवत रहावी म्हणून ती सदाची आसुसलेली आहे...

• • •

· ५ ·

# गोदूताईंची गोष्ट

गोदूताईंनीं जवळजवळ तीसपस्तीस वर्षे संसाराचा गाडा ओढीत आणला होता. वयाच्या सोळाव्या वर्षी वैद्यांच्या प्रतिष्ठित व गजबजलेल्या कुटुंबांत त्यांचा शरीरसंबंध घडला; आणि आतां वैद्यांच्या विऱ्हाडांतल्या कर्त्या गोदूताई म्हणून त्या वार्धक्याशीं येऊन ठेपल्या. ह्या काळांत गोदूताईंनीं काय पाहिलं नाहीं? होऊन गेलेल्या दोन महायुद्धांशीं घरांतल्या पुरुषांचाहि प्रत्यक्ष संबंध आला नव्हता; पण युद्धांचा परिणाम वैद्यांच्या घरावर व गोदूताईंच्या मनावर थोडाफार झाला होता. अस्थिरता, महागाई, रेशनिंग, नास्तिकता, भ्रष्टाचार, स्वैराचार इत्यादि अनेक गोष्टी पाहतांना गोदूताईंचे केस पिकले होते. खुद्द वैद्यांच्या घरांतच वांटण्या झाल्या, भिंती पडल्या, भांडणं धुमसत राहिलीं. कोंकणांतून देशावर संसाराचं स्थलांतर झालं. पस्तीस वर्षांच्या संसारांत गोदूताईंनीं तीन बाळंतपणं व एका अपत्याचा मृत्यु अनुभवाला गांठवला. घरांतल्यांचे आजार निस्तरले व नात्यागोत्यांतलीं मंगलकार्यें पार पाडलीं. अंगभर सोन्याचे अलंकार घालून त्या अनेकवार मिरवल्या, व कुठलंसं कर्ज फेडायला तेच दागिने त्यांनीं कोरड्या डोळयांनीं काढून दिले. संसाराच्या सुरुवातीला नणंदेचा जाच सहन केला आणि आतां उतरणीला, लेकीला सोन्यासारखं सासर मिळालेलं भरल्या डोळयांनीं पाहिलं. मध्यमवर्गांतली हिंदु स्त्री संसारांत जे अभिमानाचे व अपमानाचे प्रसंग पाहते, ते बहुतेक सारे गोदूताईंनीं भोगले.

अर्थात् इतर आर्यस्त्रियांप्रमाणें हा सारा प्रवास पतीमुळेंच घडला. संसारांतलीं सुखदुःखं, वळणं व वादळं नवऱ्यानेंच निर्माण केलीं आणि गोदूताईंनीं निमूट-पणीं साऱ्यांचा स्वीकार केला. दाजींच्या अवतारावर, आर्थिक अवस्थेवर,

कचेरींतल्या वेळांवर, घरांतल्या वागणुकीवर, वासनेवर, श्वासावर गोदूताईंच्या जीवनांतला प्रत्येक क्षण फुलत सुकत होता. संपूर्ण पस्तीस वर्षे–पस्तीस वर्षांचे दिवस व रात्री–त्या दाजींसाठीं, दाजींभोंवतीं जगल्या. आणि तरीहि तेवढ्यांतून त्यांचं स्वतःचं असं आयुष्य आकारित झालं. पतीच्या तालावर नाचत राहूनहि त्यांनीं पतीसकट सर्वांना बांधून घेतलं होतं व आपलं वैशिष्ट्य उमटेल असं विश्व उत्पन्न केलं होतं. केरसुणीसारख्या स्वतःच्या अस्तित्वाला लक्ष्मीचं रूप आणलं होतं; सावलीला स्वयंप्रकाश मिळवून दिला होता.

असं हें गोदूताईंचं वैवाहिक जीवन. प्रदीर्घ, परिपूर्ण. सुखासंकटांतून वाटचाल करीत आलेलं व नवऱ्याशीं क्षणाक्षणानं––कणाकणानं एकजीव होत गेलेलं! आतां वार्धक्य आल्यावर गोदूताई आयुष्याकडे वळून बघत तेव्हां त्यांना संसारांतल्या, सहजीवनांतल्या अनेक गोष्टी आठवत व अचंबा वाटे, ऊर आनंदानें भरून येई. नातवांना खेळवतांना, सुनांना समजावतांना त्यांना जितकं सुख लाभे तितकं बऱ्यावाईट जुन्या आठवणी चाळण्यांतहि वाटे; किंबहुना अधिकच! मुलं नातवंडं असलीं तरी तो पुढें धांवणारा ओघ होता. उलट गतायुष्यांत घडलेल्या गोष्टी हा त्यांचा सदा जवळ राहणारा ठेवा होता. त्यांचा नि दाजींचा. दुपारीं आणि संध्याकाळीं, ओटीवर अगर देवघरांत, एकटं असतांना वैवाहिक जीवनांतल्या अनेक घटना त्या चाळीत. मग दाजींच्या बरोबर त्याच गोष्टी रात्रीं व पहाटेहि बोलत बसत. वार्धक्यामुळें शरीर व मन थकत चाललं होतं तरी जुन्या घटनांची स्मृति अधिकाधिक टवटवीत होत होती. ते प्रसंग, तें वातावरण, त्या वेळचीं बोलणीं हंसणीं सारं ठळकपणें पुढें उभं राही. अन् त्यामुळें वार्धक्य सुसह्य वाटे. मनाला तजेला येई. एकमेकांबद्दल जास्तच जिव्हाळा उत्पन्न होई. नुसत्या आनंदाच्याच नव्हेत, तर दुःखांच्या, संकटांच्या, भांडणांच्या, अबोल्यांच्या आठवणीहि आतां सलत राहण्याऐवजीं खोलसं सुखच देत. सर्व तऱ्हेच्या घटनांना आतां सुगंध सुटला होता. आणि संसाराचा डाव नीटपणें संपवीत आणणाऱ्या गोदूताई वैवाहिक जीवनांतल्या आठवणींच्या झोंपाळ्यावर तृप्त मनानें बसल्या होत्या.

नवलाची गोष्ट आहे, पण गोदूताई आपल्या मरणाबद्दल फारसा कधीं विचार करीत नसत. जगण्याचा त्यांना लोभ होता असं नव्हे, पण मृत्यु

आपल्यापासून फारसा दूर नाहीं असं त्यांना वाटत नसे. दाजींना वाटत असे. साठी जवळ आल्यावर, कमी दिसूं लागल्यावर व अकारण अस्वस्थता वाटूं लागल्यावर दाजी आतां यमाशीं संवाद करूं लागले होते. त्यांना वाटे कीं आतां ' बोलावणं ' आलं आहे. दोनतीन, फार तर पांचएक वर्षं आपलं बूड इथें आहे. मग एक दिवस सगळं संपणार ! पेन्शन, पत्नी, पोरंबाळं, घरदार, सगळं तसंच टाकून आपल्याला वनवासी, स्मशानवासी व्हावं लागणार ! दाजी बसल्याबसल्या भविष्य बघत, वैद्यडॉक्टरशीं चर्चा करीत, देवाचं नांव घेत, पुन्हां पुन्हां पुटपुटत, ' संपलंच म्हणायचं— '

पण गोदूताईंना मृत्यु अजून वाकुल्या दाखवीत नव्हता. आपण लवकरच मरणार, ह्या मायेच्या पसाऱ्यांतून उचलल्या जाणार, असल्या विचारांशीं त्या खेळत नव्हत्या. अगदीं आजच मरण आलं तरी त्यांची तयारी होतीहि. सर्व जबाबदारी पार पाडल्याचं समाधान व पतीसह घालवलेल्या आयुष्याच्या आठवणींचा सांठा घेऊन त्यांना भरल्या कपाळानं, भरल्या मनानं जातां आलं असतं. पण गोदूताईंना वाटे, अकारण अन् कुठें मनाच्या कोपऱ्यांत वाटे, कीं आपण इतक्यांतच मरत नाहीं. हेच जाणार ! हेच जाणार अन् मग आपल्याला पतीविना वैधव्यावस्थेंत कांहीं काल कंठावा लागणार. पस्तीस वर्षं एकत्र घालवित्यावर आतां कांहीं वर्षं, निदान एखादं वर्ष तरी, आपल्याला एकटं राहावं लागणार. तशी त्यांना हौस होती असं नाहीं, उलट तो काळ म्हणजे दिव्यच होतं. पण आपल्यावर असा प्रसंग येणार असं त्यांना वाटे, एवढं बरीक खरं. आजूबाजूला कितीतरी समवयस्क स्त्रिया, रस्त्यावर दिसणाऱ्या व माहितींतल्याहि, विधवा होत्या. बायको मेलेल्या वृद्ध पुरुषां-पेक्षां नवरा मेलेल्या पोक्त बायाच अधिक दिसत. आणि चारचौघींशीं सदा तुलना करणारं गोदूताईंचं मन स्वतःला विधवेच्या विद्रूप अवस्थेंत पाहात राही.

विधवा झाल्यावर गोदूताईंनीं काय केलं असतं ?—वैधव्याच्या कल्पनेनं प्रथम त्यांना कांपरं भरे. अभद्र विचार दूर सारण्याचा त्या सारखा यत्न करीत. मग पडलेल्या झाडाबरोबर थरथरणारी हिरवी वेल त्यांच्या डोळ्यांपुढें येई. आधार तुटलेल्या वेलीची उपमा कथापुराणांतून ऐकून ऐकून त्यांच्या डोक्यांत रुतून बसली होती. वैद्यांच्या घरांतून ' सोवळं ' होण्याची चाल

गेली असल्यानें, आपण स्वतः सोवळया कशा दिसूं ह्याची त्या कल्पना करीत. आणि अखेर त्यांना आसरा सांपडे कीं आपल्यावर आपत्ति आली तरी पतीसह दीर्घकाल जें जीवन आपण घालवलें त्याच्या अनेक आंबटगोड आठवणी आपल्याजवळ आहेत. त्यांची पतीसह उजळणी करतां यायची नाहीं; पण त्या स्मृति स्वतःशीं उगाळीत बसत आपण उरलेला वेळ काढूं शकूं. वैवाहिक आयुष्यांतल्या त्या मुग्ध, लाजऱ्या, विचित्र, प्रौढ, भयंकर व वैभवशाली घडामोडी आपण आठवूं ! कल्पनेनें पुन्हां पाहूं, भोगूं. प्रदीर्घ सहजीवनानें जो अमोल ठेवा आपल्याला दिला आहे त्याच्या जोरावर आपण वैधव्यावर सहज मात करूं.

इतकं सारं धोरण बांधून गोदूताई वागत होत्या, तरीपण एखादे दिवशीं दाजींना बरं वाटत नसलं कीं, त्या अस्वस्थ होत. फार पूर्वी कचेरींत जातांना दाजींच्या पायावरून सायकल गेली होती. त्यावेळचा तो मुका मार आतां इतक्या वर्षांनीं कधीं कधीं तोंड काढीत असे. दाजी दुखरा पाय कष्टानें उचलीत संध्याकाळच्या सहलीहून येत व घाबरलेल्या मनानें गोदूताई तेलाची वाटी आणायला धांवत. बदलत्या ऋतुमानांत दाजींचा दमा कमीअधिक बळावे व गोदूताई काढ्यांची, लेपांची, शेकण्याची एकच लगबग करीत. दाजींचें प्रकृतिमान, त्यांना होणारीं व होऊं शकणारीं दुःखणीं, आजारपणांत त्यांच्या वागण्यांत येणारा हळवेपणा व आकस्ताळेपणा, आणि ह्या सर्वांना सांभाळणारं पथ्यपाणी ह्यांची गोदूताईंना पूर्णपणें कल्पना होती. ज्या दीर्घ सहवासानें गोदूताईंना हें ज्ञान झालें होतें, त्याच सहवासानें त्यांना नवऱ्याला जीवापाड जपण्याची जाणीव करून दिली होती. म्हणून दाजी जरा दमलेले दिसले, अन्नावरून उठून गेले अगर अवेळीं पडून राहिले कीं, गोदूताई नातवंडांना सोडून झोंपाळयावरून उठत व दाजींच्या भोंवतीं पहारा करीत.

...पावसाळयांतल्या एका पहाटे दाजी जेव्हां अंथरुणांत कण्हत असल्याचा गोदूताईंना संशय आला तेव्हां त्या दचकून जाग्या झाल्या व तोंड धुणं, देवाला नमस्कार करणं वगैरे सर्व विसरून दाजींचं पोट शेकत बसल्या. दाजी एखाद्या लहान पोरासारखं विव्हळत होते व गोदूताईंच्या अंगावर तीनतीनदां ओरडत होते. आदल्याच दिवशीं दुपारीं त्यांनीं लहान पोरासारखी अधाशीपणानें डाळ खाल्ली होती व गोदूताईंनीं हात आंखडता घ्यायची सूचना करतांच ते

त्यांच्यावर खेंकसले होते. रात्रीं गप्पा मारतांना गोदूताईंनीं त्यांना टोमणा दिला होता व दाजींनींहि हंसून गोड केलें होतें. अन् मग दोघेहि बराच वेळ तारुण्यांतल्या असल्या भांडणाच्या आठवणी काढण्यांत रंगले होते. काल हें सारें घडलें, अन् आज दाजी पोटदुखीनें पडले. ह्या माणसाला किती नि कसा सांभाळायचा असा विचार गोदूताईंच्या मनांत आला अन् तरीहि त्या सराईतपणें सारी शुश्रूषा करूं लागल्या.

दुपार उलटल्यावर दाजींच्या दुखण्याला उतार पडला. त्यांना शांत झोंप लागली. सुनेच्या शब्दाखातर चार शितं खाऊन गोदूताई परत पतीच्या पायगतीं बसल्या. त्यांना शांत वाटत होतें, शंकाहि वाटत होती आणि ह्या सर्व संभ्रमांतून नवऱ्याबद्दल अधिकच माया वाटत होती. ‘ किती हट्टी, हळवा नि विचित्र स्वभाव स्वारीचा ! ह्यांना चिडायलाहि वेळ नाहीं नि लाड करायलाहि सुमार नाहीं. ह्यांची तब्येत सांभाळणं म्हणजे तारेवरची कसरतच आहे. आपल्या जागीं दुसरी एखादी बाई असती तर ह्यापूर्वीच झिजून गेली असती. जेव्हां ह्यांची नोकरी जायची वेळ आली होती आणि...’

मग मागल्या आठवणी गर्दी करूं लागल्या. आनंदाच्या अन् आंसवांच्या. साऱ्याच हंसऱ्या बालकांसारख्या रांगत रांगत गोदूताईंच्याकडे येऊं लागल्या. आजच्या आजाराची हकीगतहि अशीच हंसरी होत त्यांना बिलगूं लागली...

पण फिर्रर्र तिन्हीसांजेचं दाजींचं पोट परत दुखूं लागलं. कळा येऊन ते गडबडां लोळूं लागले. सारं घर त्यांनीं डोक्यावर घेतलं. गोदूताईंच्या बटव्यां-तलीं सारीं औषधं उपयोगांत आणलीं गेलीं. पण कळा कमी होईनात. रात्रभर गोदूताई, मुलं नि सुना जागून होत्या. सकाळ होतांच मोठ्या लेकानें डॉक्टरना आणलं. डॉक्टरनीं बराच वेळ तपासणी केली अन् मग गंभीरपणें एका बाजूला जाऊन मुलाला कांहींतरी सांगितलें.

दाजींना एकाएकीं झालेल्या ह्या दुखण्यानें गोदूताई उन्मळून गेल्या. हें नुसत्या डाळीचं दुखणं नाहीं, कसलंतरी कठीण, कदाचित् असाध्य दुखणं आहे, हें त्यांनीं हेरलं व त्यांच्या मनाची पाल चुकचुकली. कधींमधीं येणारी वैधव्याची कल्पना त्यांना आठवली व त्यांनीं स्वतःचा धिक्कार केला. त्यांचा झोंपाळा आतां सुटला व दाजींच्या अंथरुणाभोंवतीं फेऱ्या सुरू झाल्या. देवघरांतहि त्या फक्त फुलं वाहायला व फुलवात लावायला जात. सुनांवरचं

लक्ष कमी झालं. नातवंडांना गप्प करण्यापुरतंच त्या घरांत बोलत. स्वतःशीं अगर पतीसह गतगोष्टींत रंगून जाणं तर संपलंच. तिन्ही त्रिकाळ औषधं देणं नि नवऱ्याचा कल सांभाळणं ह्यांत त्या गुरफटून गेल्या.

...पण दाजींचं दुखणं रेंगाळत राहिलं. त्यांचं अंथरूण कायमचं पसरलेलं राहिलं. जवळच्या तिपाईवर औषधांच्या बाटल्या, शेकण्याच्या पिशव्या, फळांची टोपली, पाण्याचा तांब्या, थर्मामिटर, तस्त ह्यांची गर्दी झाली. रोज डॉक्टरांची खेप सुरू झाली व रोज पोटांत घेण्याच्या, वरून चोळण्याच्या औषधांची आवक होऊं लागली. दुखण्याचं निदान होईना. एकदोन तज्ज्ञ डॉक्टर बोलावले. पुन्हां नव्या बाटल्या, पुन्हां नवें पथ्य !...पुन्हां पावसाळा आला तो चालू असलेल्या पोटदुखीबरोबर दमा घेऊन आला. मधुमेहाचा विकार झाला असावा असाहि डॉक्टरना संशय होता. महिनेन्‌महिने चाललेल्या ह्या दुखण्यानं दाजींच्यासकट सारींचजणं कंटाळलीं. वडिलांना असाध्य आजार झाला आहे असं मुलांच्या मनांनीं घेतलं. सुनांच्या नित्यक्रमांत आजाऱ्याचं दूध, लापशी, कपडे, कढत पाणी ह्यांचा समावेश झाला. नातवंडं आजोबांच्या खोलीकडे जायला भिऊं लागलीं. खुद्द दाजी ह्या दीर्घकाळच्या दुखण्यानें खचून गेले. पोटदुखीच्या विकारानें आजारी पडलेल्या माणसाची होते तशी त्यांची दारुण अवस्था झाली होती. औषधं पिऊन तोंडाची चव गेली होती. सारखं आडवं पडल्यानें मन चिडून गेलं होतं. दुखण्यानें, दुःखानें जीव कसा कोळपला, कावला होता...

गोदूताईंच्या तत्परतेंत, शुश्रुषेंत कमतरता होत नव्हती. परंतु नवऱ्याचं हें अखेरचं दुखणं आहे हें त्यांनीं आतां हेरलं होतं, मान्य केलं होतं. डोळ्यांतून पाणी वहात असतांना नि हृदयांत दुःखाचे लोट उठत असतांना त्यांना उमगलं होतं कीं आतां कांहीं हे बरे होत नाहींत. आपल्या पायावर परत उभे राहात नाहींत. त्या अधिक कळवळ्यानें शुश्रूषा करीत, दाजींना धीर देत, त्यांच्या विचित्र लहरी व वेडावांकडा संताप सहन करीत; पण त्यांना हें स्पष्ट दिसत होतं कीं कुठली तरी प्रचंड शक्ति मुंगीच्या चालीनें आपल्या नवऱ्याला मृत्यूकडे नेत आहे...आणि आपण अखेर एकटया उरणार आहोंत, विधवा होणार आहोंत !

विधवा झाल्यानंतर गोदूताई काय करणार होत्या ?—भविष्यकाळच्या त्या

कल्पनेनेंच त्या कावऱ्याबावऱ्या होत. हें अंथरूण इथें नसणार, ही मूर्ति डोळयांपुढें नसणार, ह्या जाणिवेनें त्या हतबल होत. दाजी गेल्यावर जगण्यांत अर्थ तर नव्हताच आणि जिवंत रहाणं साधणारहि नव्हतं. तरी तसं त्यांना राहणं प्राप्त होतं...मुलांच्या आधारावर, नातवंडांना खेळवीत, सौभाग्यावस्थें-तल्या पूर्वस्मृति चाळीत...

गोदूताईंचं मन वारंवार आजाऱ्याच्या खोलींतून उठून जाई. मुलांनातवंडां-कडे पाहून आपल्या आयुष्यांतली पोकळी कमी होईल असं त्यांना वाटत नसे. मग त्या तशाच एकाकी, उजाड मनानें गतायुष्यांत डोकावत. तीसपस्तीस वर्षांच्या सहजीवनांत, संसारांत जे अनेक सुखदुःखांचे प्रसंग लिहिले गेले तीं पानें चाळीत. जें नवऱ्याच्या पश्चात् करावयाचें तें आतांपासूनच करीत. मनाला विरंगुळा देत, वळण लावीत...

म्हणून गेला सारा आठवडा दाजी दिवसरात्र बडबडत — संतापत होते तरी गोदूताई यांत्रिकपणें सारं सहन करीत होत्या. कर्तव्यांत कसूर न करतां जागत होत्या. आणि त्यांचं मन एकेका मुलाच्या मुंजींतलीं रुसणींफुगणीं आठवीत होतं. जणूं तीं रुसणींफुगणीं, ते दिवस नि ते दाजी हेंच सत्य होतं, सजीव होतं; आणि काळानें पोखरल्यामुळें पीडित झालेले आजचे दाजी आणि त्यांच्या आजारानें आयुष्याला आलेली असली अवकळा हा केवळ भास होता.

आठदहा दिवस आकस्ताळेपणा करणारे दाजी नवव्या दिवशीं एकाएकी चूप झाले, आढ्याकडे टक लावून पाहात राहिले. उसासे टाकीत स्वतःशींच पुटपुटत राहिले. हा बदल गोदूताईच्या एकदम ध्यानांत आला. तब्येत सुधारते आहे असं वाटलं, अन् त्यांचं विचित्र वागणं पाहून भीतीहि वाटूं लागली.

मग दुपारीं गोळया घेतांना दाजींनीं एकदम बायकोचं मनगट धरलं नि विचारलं, "आज तारीख काय ग ?—"

"तारीख ? आज चतुर्थी ना वद्यांतली ?" कॅलेंडर नसलेल्या भिंतीकडे पाहात गोदूताई उद्गारल्या.

"आज चौदा तारीख. चौदा जानेवारी ! आपल्या लग्नाचा वाढदिवस ——"

दाजींचे घोगरे शब्द ऐकून गोदूताई दचकल्या. खरंच, त्यांच्या विवाहाचा वाढदिवस होता आज ! पुरीं पस्तीस वर्षं झालीं होतीं. अनेक वर्षांच्या, अनेक वाढदिवसांच्या गोड आठवणी त्यांच्या मनांत गर्दी करूं लागल्या —

दाजींनीं त्यांचं मनगट सोडून दिलं व म्हटलं, " आठवतं ?--तीस सालीं, लग्नाच्या वाढदिवसाला मीं चंदेरी लुगडं तुला आणलं होतं. बाबा रागावले, परत कर म्हणाले, पण मीं तसंच तुला घडी मोडायला दिलं. तूं नेसून--"

गोदूताईंना सारं आठवलं. जणूं तें चंदेरी लुगडं त्या आतां दाजींच्या पुढ्यांत नेसत होत्या. आनंदाश्रूंनीं त्यांचे डोळे डबडबले व वाळलेली यष्टि थरथरली.

दाजींनीं तेवढ्यांत मान वळवली व रडक्या स्वरांत ते म्हणाले, " तुझ्या-भोंवतीं नाचलों नि त्या नादांत बाबांचा मान ठेवला नाहीं. त्यांनीं अपमान गिळला, पण माझं मन मला खात राहिलं. आजवर बोललों नव्हतों, पण दर वाढदिवसाला माझ्या नादानपणाची आठवण येते. बाबांना दुःख —"

दाजींचे शब्द हुंदक्यांत अडकून पडले व गोदूताई गलबलून गेल्या. चंदेरी लुगड्याच्या हकीकतीची गोड आठवण त्यांना अश्रूनमधून सुख देत होती. सबंध आळींत त्यावेळीं कुणाजवळ नसलेलं तसलं लुगडं, नवऱ्यानें तें घेतांना दाखवलेली धिटाई व प्रेम, सासूबाईमामंजींच्या समोर आपण दाखवलेला तोरा– आणि आतां दाजी त्या गोड गतगोष्टीच्या चिंध्या चिंध्या करीत होते. दाजींच्या अंगावरची दुशाल ठीक करीत गोदूताई म्हणाल्या,

" राहूं दे–स्वस्थ..."

" राहूं दे कसं ? तुझ्यापायीं माझं सारंच चुकत गेलं. लुगड्याचं तसंच झालं नि नंतर पाटल्या केल्या तेव्हां..."

आतां पाटल्यांबद्दल काय बोलणं होणार तें गोदूताईंना कळेना. त्यांतली एक पाटली तर त्यांनीं आळंदीला जातांना हरवली होती व त्याबद्दल दाजींची थप्पडहि खाल्ली होती. त्या पाटल्या व तो 'प्रसाद' त्यांच्या मनाच्या तिजोरींत सुखरूप होता. पण आतां दाजी...गोदूताई तिथून उठल्या व उंबरठ्यापाशीं येऊन उभ्या राहिल्या !

...आतां उंबरठ्यावर उभं राहतांना, खिडकींतून बाहेरच्या जगाकडे पाहतांना, रात्ररात्र एकटं जागत बसतांना गोदूताईंना दचकल्यासारखं होऊं लागलं. नवऱ्याला सोडून राहणारं त्यांचं मन गतकाळांतलें स्मृतींचें धन पाहात राही. ते अलंकार त्या अंगावर घालीत. त्या महावस्त्रावर माथा टेकीत. ती स्मरणसांखळी ओढीत वेळ घालवीत. पण आतां मध्येंच कांहींतरी खुपल्यासारखें होई. एवढ्या संभारांत तें फाटकें चंदेरी लुगडें नि त्या हिणकस, हरवलेल्या

पाटल्या त्यांना अस्वस्थ करीत. ओशाळून त्या भानावर येत व दाजींच्याकडे दयेच्या याचनेनें पाहात. नवऱ्यानीं कण्हावं, चहा मागावं, औषधाचा पेला फेंकून द्यावा, शेकायची पिशवी फार कढत दिली म्हणून शिवी हासडावी, पण जुन्या गोष्टींचा उच्चारहि करूं नये असं त्या मनांत भाकूं लागल्या.

दाजी परत बायकोला जुन्या आठवणींबद्दल बोलले नाहींत. पाटल्यांची हकीकत ते विसरले व गोदूताईंना न विचारतांपुसतां स्वतःशींच गुंगून पडूं लागले. गोदूताईंचं मन जरा जाग्यावर आलं, शांत झालं.

पण एक दिवस डॉक्टर आले तेव्हां दाजी नेहमींप्रमाणें औषधाबद्दल तक्रार न करतां म्हणाले, " मीसुद्धां डॉक्टर होणार होतों. अगदीं एम्. बी. बी. एस्.—"

डॉक्टर हंसले नि म्हणाले, " झालां असतांत, तुम्ही उत्तम डॉक्टर झालां असतांत—"

" नक्कीच. असं पेशंटला त्रास देत ठेवलं नसतं. मी जाणारच होतों मेडिकलला. पण—पण ही माशी शिंकली. लग्न करावं लागलं नि संसाराची जबाबदारी घ्यावी लागली. कसलं शिक्षण नि कसलं काय ! मामलेदार कचेरींत मिळाली ती नोकरी धरावी लागली... "

डॉक्टर परत जाण्याच्या घाईत होते, पण दाजींनीं त्यांना थांबवून आपल्या डॉक्टर होण्याच्या ध्येयाची, लग्नाच्या सक्तीची व संसाराच्या वाढत्या बेड्यांची हकीकत, जुनाट रोगांचा इतिहास सांगावा, तशी घोळून आठवून सांगितली. भेटायला येणाऱ्या लोकांना, शेजाऱ्यांना अन् मुलांना नि सुनांना आतां ते हीच हकीकत सारखी सांगूं लागले. तेंच एक दळण त्यांच्या डोक्यांत सुरू झालें होतें, ' सक्तीनें लग्न करावं लागलं, संसारापायीं कारकुनी करावी लागली, सारं वाटोळं झालं...'

गोदूताईंना हें सारं असह्य झालें. नाइलाजानें नोकरी धरावी लागली, सक्तीनें लग्न करावें लागलें, इत्यादि ज्या जुन्या जखमा दाजी दाखवीत होते त्या गोदूताईंना नव्या होत्या. त्यांना आपला पति बडा डॉक्टर—वकील झाला असतां तर हवाच होता. पण डॉक्टरीच्या कोर्सला प्रवेश मिळाला नाहीं व अखेर मिळालेली नोकरी धरावी लागली हें सासूबाईच एकदां म्हणाल्या होत्या अन् वडील माणसांच्याच संमतीनें का होईना, पण महाडची ती गोरीपान

मुलगी नाकारून दाजींनीं आपलीच निवड केली ही मंगळसूत्राइतकी मानाची आठवण त्या विसरूं शकत नव्हत्या. पण दाजी विसरले होते नि वाटेल तें वडबडत होते.

रोजचं पुराण ऐकून अखेर एकदां त्या नवऱ्याला म्हणाल्या, "हें काय ? ज्याच्या त्याच्याजवळ बोलत सुटतां! लग्नाची नि नोकरीची कुणी बळजबरी केली आपल्यावर ? अन् असं होतं तर नोकरी लागल्यावर दोनच वर्षांनीं कचेरींत भांडण झालं तेव्हां नोकरी सोडून अभ्यास करायची संधी आली होती... "

"पण तूं होतीस ना माझ्या मानगुटीला. अन् तुझ्या पोटांत बाळ. दोघंजणांनीं मला नाक धरून साहेबाची माफी मागायला लावलंत. जन्मभर माझा..."

करायला गेलं एक नि झालं भलतंच असं गोदूताईंना झालं. कचेरींत जें भांडण झालं...पण गोदूताईंनीं विचार करणंच सोडून दिलं! त्यावेळच्या साऱ्याच चांगल्यावाईट घडामोडी आतां खुपूं लागल्या होत्या. दाजींची वडबड चालूच राहिली....आतां त्यांनीं निराळंच काढलं. मुलीच्या लग्नांत तूं माझा अपमान केलास म्हणून गोदूताईंना ते निंदूं लागले. गोदूताईंची जरा चूक झाली होती हें खरं. त्याबद्दल त्यांनीं पतीचे पायहि धरले होते. पण आतां इतक्या दिवसांनंतर अन् असल्या आजारांत दाजींनीं कारण नसतांना नि सूडबुद्धि ठेवल्यासारखं तें वर्म उकरून काढावं व बायकोला बोल लावावा ह्याचं गोदूताईंना दुःख झालं. दीर्घकाळच्या कठीण दुखण्यानें माणूस चिरचिरा होतो, वेडापिसा होतो, वगैरे सारं त्यांना मान्य होतं. पण म्हणून ह्यांनीं जुन्या आठवणी भडक व भयानक करून स्वतःचा व इतरांचा छळ करावा ह्याचा त्यांना ताप झाला. ह्या असल्या वागण्या-बोलण्यानं त्यांना जाग्रणं नि एकान्तहि असह्य झाला.

मुलीच्या लग्नाचं हें पर्व कधींतरी संपलं नि मग दाजींनीं बायकोला सोडून मोठ्या लेकाला धारेवर धरलं. उभा जन्म म्हणे तो वडिलांना दुःख देत आला. त्याच्यापायीं दाजींना खूप खर्च पडला, कष्ट झाले अन् अखेरीस तो बापाचा द्वेषच करतो आहे, इत्यादि भरमसाट बडबडणं दाजींनीं सुरू केलं. वडिलांना टाळणारा लेक अधिकच दूरदूर राहूं लागला. तेंच इतर मुलांनीं नि

सुनांनीं सुरू केलं. आणि असं होण्यापेक्षां आपल्याला शिव्या देणं, आपल्या सहजीवनांतल्या स्मृतींची राख होणं परवडलं, असं गोदूताईंना झालं...

न संपणाऱ्या दुखण्यासारखा दाजींचा हा जुन्या गोष्टी चिवडण्याचा न संपणारा खेळ सुरू झाला. बदलत्या पथ्यपाण्यासारखे त्यांचे गतगोष्टींबद्दलचे उल्लेखहि बदलत होते. दुःखाच्या नि दैन्याच्याच नव्हेत, तर मानाच्या नि मोलाच्या अनेक घटना त्यांनीं कुस्करून टाकल्या. पस्तीस वर्षांतल्या संसारांतल्या, सहजीवनांतल्या, ज्या अनेक आठवणी एखाद्या आदर्श गृहिणीप्रमाणें गोदूताईंनीं जमवल्या जपल्या होत्या, त्या साऱ्या ओळीनें वाळून गळून गेल्या. स्वतःच्या संसाराच्या स्मृतींना आग लावून देण्याचं अघोरी कृत्य करणाऱ्या नवऱ्याजवळ त्यांना जावेना. आणि त्याला टाळून उंबरठ्याबाहेर, परसदारीं, देवघरांत, मोकळ्या जागीं त्यांना पाऊल टाकवेना.

...मुसळधार पावसाच्या एका अपरात्रीं तर दाजींनीं भलताच उग्र अवतार धारण केला. दिवसेंदिवस त्यांचं दुखणं विकोपाला जात होतं अन् बडबडणंहि बेताल होत होतं. बायकोला बोल लावणं, कधीं तिची क्षमाहि मागणं, मुलांना जवळ घेणं, जुन्या आठवणी काढून रडणं! जुन्या घटनांचा त्यांचा त्यांना मेळ लागत नव्हता नि त्यांच्या बोलण्यांतलं खरंखोटं इतरांना कळत नव्हतं! अन् आज तर ते सर्व शक्ति एकवटून उठले आणि प्राण पणाला लावून बोलूं लागले,

"...ती हवी होती. नमू हवी होती आज! म्हणजे मीं सुखानें प्राण सोडला असता. माझी नमू, जिवाची राणी, ती आज असती तर माझे असे हाल झाले नसते..."

गोदूताई दचकून उठल्या. दाजींना वस्त्राची शुद्ध नव्हती व ते भयंकर बडबडत होते. घाम फुटत असतांनाच त्या म्हणाल्या,

"काय झालंय् तरी?—काय कमी आहे तुम्हांला?—"

"कमी...! तीच कमी आहे. ती न मिळाल्यामुळें..."

"कोण ती? आपण मुंबईला होतों, तिथली शेजारची नमू का?—पण तें सारं खोटं होतं ना?—तें पत्र नि तें..."

गोदूताई कष्टानें एकेक शब्द बोलत होत्या. त्यांच्या हातापायांना कांपरं भरलं होतं अन् डोक्यांत सणक मारत होती. दाजींच्यावर किटाळ आल्याची

आठवण, अन् त्यांतून ते निसटून परत बायकोकडे आले त्यावेळचा आनंद आतां पेट घेत होता.

"...खोटं ?...अंहं...तूं उगाच आकांडतांडव करूं नयेस म्हणून खोटेपणाचं नाटक करावं लागलं मला ! नाहींतर तूं डोक्यांत राख घातली असतीस. पोराबाळांना सोडून गेली असतीस...नमूबद्दलचं खरं होतं...एवढंच नाहीं, तर पुढें कित्येक वर्षं आम्ही भेटत होतों. माझं मन तिच्याजवळच गुंतलं होतं. मनानं मीं तिच्याशींच संसार केला. गेली ती...नमू...नमू..."

दाजींनीं गळा काढला नि सारं घर गोळा झालं. गोदूताईंना स्वतःचा तोल राखणं अशक्य झालं. वात झालेल्या नवऱ्याला सांभाळावं कीं जमलेल्या लोकांना घालवावं, कांहींच कळेना. त्या स्वतःच मटकन् खालीं बसल्या. पस्तीस वर्षं बाळगून ठेवलेला पतीबद्दलचा विश्वास पतीनेंच पुसून टाकला व गोदूताईंना विधवा झाल्यागत वाटलं...!

...मृत्यूशीं शेवटची टक्कर देत दाजी अंथरुणावर तडफडत होते आणि गोदूताई प्रेतासारख्या त्यांच्या उशाशीं बसल्या होत्या. तीस पस्तीस वर्षांच्या समृद्ध सहजीवनाची फुलबाग उध्वस्त करून त्यांचा सहचर चालला होता. ज्या मुग्ध, लाजऱ्या, विचित्र, प्रौढ, भयंकर व वैभवशाली घटनांची शिदोरी त्यांना एकाकी आयुष्यांत पुरवायची होती, त्यांतच राख कालवली गेली होती. प्रदीर्घ सहजीवनाचं आगळं सुख भोगल्यानंतर सहचरानं आजारी पडावं, दीर्घकाळ खितपत पडावं, आणि त्यामुळें जमलेला स्मृतिसंभार कलंकित करावा ह्यासारखा संसारांत दुसरा शाप नाहीं ! आपल्या जोडीदाराच्या संसारांतल्या वर्तनापेक्षां त्याच्या अखेरच्या आजारांतली विकृति, त्याच्या साथीपेक्षां त्याचा शेवट, हाच अधिक महत्त्वाचा असावा हें केवढं भयानक ! तो भयानकपणा वैद्यांच्या कर्त्या गोदूताईंच्या वांट्याला आला...कुठल्याहि क्षणीं दाजी जग सोडून जातील हें गोदूताईंना दिसत होतं; आणि त्यांच्या पश्चात् त्यांच्यासह घालवलेल्या दिवसांचा सुगंधहि उरणार नाहीं हें उमगल्यामुळें, त्या आपले प्राण आधीं जावेत म्हणून प्रार्थना करीत होत्या !

• • •

. ६ .

# निष्ठा

It is better to have loved and lost, than never to have loved at all. वाचायला हें वाक्य मोठं लोभस वाटलं तरी प्रेमभंगाच्या इंगळ्या सहन करणाऱ्यांची अवस्था पाहिली कीं, ह्या वाक्याचा फोलपणा पटतो. लव्ह म्हणजे खेळ, गंमत, अनुभव असाच अर्थ धरून ही ओळ लिहिली गेली व ती लोकप्रिय झाली असं वाटतं. पण खेळ खेळणं निराळं नि प्रेम करणं निराळं. प्रेम जितकं भव्य, दिव्य, सखोल, सच्चं, तितकी प्रेमभंगाची आगहि दाहक, सर्वस्व छिन्नविच्छिन्न करणारी. त्यांत होरपळून निघालेला व सदैव जळणारा कुणी माणूस पाहिला कीं, प्रेमाच्या भावनेला स्पर्श न होईल तर परवडेल असंच म्हणायची पाळी येते.

असा एक माणूस मॉडेल कॉलनींत दृष्टीस पडतो. शहराबाहेरच्या त्या नव्या वस्तीकडे अनेक तरुण फिरायला जातांना दिसतात. टीचभर कंबरा नि वीतभर केंस असलेलीं, सिगारेटची कांडी अगर सिनेमांतलं गाणं तोंडांत घोळवणारीं तीं पोरं पाहिलीं कीं वरील कविवचन कां लिहिलं गेलं तें उमगतं. कुणाच्या हालचालींत, बोलाचालींत उत्कटता आढळत नाहीं. तिरीमिरीनें कुणी प्रेम करील असं वाटत नाहीं. प्रेमांत फसवणूक झाली तर आजन्म तो व्रण वागवील असं कुणी दिसत नाहीं. पण मग मध्येंच मोटारसायकलचा आवाज घुमूं लागतो. सात अश्वशक्तीच्या अवजड गाडीवरून वेगानें जाणारा मधुसूदन म्हात्रे नजरेस पडतो. सशक्त व सुडौल शरीराचा तो तरुण पुन्हां पुन्हां पाहावासा वाटतो. वाटेवरची प्रत्येक स्त्री त्याच्याकडे पाहते. कुणा भाग्यवतीच्या...पण नीट निरखून पाहिलं तर त्याच्या देखण्या मुद्रेवर कसलीशी उदास छटा आढळून येते. डोळ्यांत कसलीतरी वेदना कांठोकांठ

भरली आहे असं वाटतं. असं वाटतं कीं, हा पुरुष प्रेमाच्या प्रतारणेनें कायमचा विद्ध झाला आहे.

तें खरंहि आहे. मधुसूदन म्हात्रे मोटारसायकली हिंडवतो, दुरुस्त करतो. मॅाडेल कॅालनींत त्याचं एक दुरुस्तीचं दुकान आहे; तेथें मालकाच्या भूमिकेंत सूटबूट घालून टेबलाशीं बसणारा व कामगाराच्या तेलकट, मळकट कपड्यांत यंत्रांशीं खटपट करणारा अशा दोन्ही रूपांत तो दिसतो; सारखाच आकर्षक वाटतो. तो कुशल कारागीर आणि चतुर धंदेवाला आहे. गिऱ्हाईकांच्या गर्दीइतकीच मित्रांची रीघहि त्याच्याकडे असते. तरी पण हेंहि खरं कीं ह्या यशस्वी, आनंदी आयुष्याआड त्याचं रक्तबंबाळ हृदय सारखं टाहो फोडीत असतं. वेणूनें केलेल्या वंचनेमुळें त्याचं मन भ्रमिष्ट झालेलं असतं.

वेणूसारख्या सुमार मुलीवर मधुसूदननें प्रेम करावं हें एक आश्चर्यच होतं! पण त्यानें प्रेम केलं तें मात्र अतिशय उत्कटतेनें, सर्वस्व एकवटून! रूपाची, जातीची, पैशाची, परिस्थितीची, कशाचीहि पर्वा न करतां तो पिसाटासारखा तिच्या प्रेमांत पडला. वेणूपेक्षां वरचढ असणाऱ्या व त्याच्यापायीं वेड्या होणाऱ्या तरुणींच्या आश्चर्याची वा आर्जवांची त्यानें कदर केली नाहीं; व वेणूमुळें असूया, अभिलाषा इत्यादि क्षुद्र भावनांच्या पार तो केव्हांच गेला. वेणूनें त्याला वचन दिलं, आपला म्हटलं, जन्मोजन्मींचा जोडीदार म्हटलं व मधुसूदनचं मन धन्य झालं. दीड दोन वर्षं तो प्रीतीच्या भावनेंत धुंद होता. आयुष्यांतल्या अनेक गोष्टींकडे आत्मीयतेनं, आसुसून पाहात होता. जीवनांतल्या अनेक कोड्यांचा अर्थ त्याला उलगडत होता व भावी सहजीवनाचे असंख्य बेत तो बांधीत होता.

परंतु एक दिवस वेणूनें त्याला तोडलं. ती त्याला टाळूं लागली, मग टाकून बोलूं लागली, आणि अखेर एका इसमाचा हात धरून ती निघून गेली, नाहींशी झाली. वेणूच्या ह्या कृत्याचा मधुसूदनला अर्थच कळेना. त्याचा विश्वास बसेना. तो विश्वास ठेवायलाच तयार होईना. पण शब्दांनीं, कृतींनीं व अखेर पलायनानें नि परक्याशीं लग्न लावून वेणूनें त्याला तें पटवून दिलं. स्त्री फसवूं शकते, स्वप्नं विसरते, शपथा मोडते आणि कांहींतरी सबब सांगून सहचराला सोडूं शकते हें उघड्या डोळ्यांनीं व फाटत्या हृदयानें मधुसूदनला पाहावं लागलं.

शक्य असतं तर मधुसूदननें वेणूच्या नवऱ्याचा व वेणूचाहि खून केला असता. पण लग्न लावून दोघांनीं लगोलग परदेशीं प्रयाण केलं नि मधुसूदनला हात चोळीत राहावं लागलं. त्याला पुन्हां तिची भेट घेतां येईना कीं सूड घेतां येईना. सुन्नपणें तो जगत होता. मग त्याच्या ध्यानांत आलं कीं वेणूच्या नवऱ्याचीं त्यानं खांडोळीं केलीं असतीं, पण वेणूच्या केंसालाहि धक्का लावण्याचं धैर्य त्याला झालं नसतं. वंचनेनंतरहि वेणूची त्याला घृणा येईना. तिच्या कृत्यानें आयुष्यांत अनर्थ घडूनहि तो तिचीं स्वप्नं पाहात राहिला व तिच्यावर प्रेम करीत राहिला. ज्या प्रीतिभावनेचा त्याला साक्षात्कार झाला होता, ती तशीच अभंग राहिली. अन् म्हणून तो जास्तच जखमी झाला, सारखा जळत राहिला.

काळाच्या कणिसानेंदेखील मधुसूदनची जखम भरून येईना. उलट प्रीतिभावनेवरील श्रद्धेमुळें तो अधिकच पिसाट बनला. चारचौघांसारखा तो जगत होता धंयांत यश मिळवीत होता, पण चारचौघां प्रेमभंग झालेल्या तरुणांसारखं आपलं शल्य विसरूं शकत नव्हता. ह्या जगांत प्रेमाची टिंगल होते, खेळ होतो, हें तो बघे नि त्याचं हृदय धगधगूं लागे. कुणी कुणाला प्रीतीच्या विषयांत भुलथापा देणं हें त्याला पाहावतच नसे. मग कुठें ओळखीच्या वा अनोळखी ठिकाणीं प्रेमभावनेचा बाजार मांडलेला दिसला, कीं तो धांवत जाई व सारं निस्तरायचा यत्न करी. त्याच्या अशा विचित्र वागण्यानं त्याचे बालपणचे एकदोन स्नेही तुटले होते व परक्या ठिकाणींहि त्याचं नांव बद्दू झालं होतं. पण मधुसूदनला त्याची पर्वा नव्हती. कुठें प्रतारणा दिसली कीं तो प्रहार करूं लागला...एकदां तर त्यानें आजकालच्या चित्रपटांतील पोकळ प्रणयावर लेखमाला लिहिली; आणि एकदां कुठल्याशा सभेंत विवाहसंस्थेवर वादविवाद चालला असतांना तिथें जाऊन भांडण केलं. आपली एक चुलतबहीण एका मुलाबरोबर बोलतांना दिसली तशी तिला तिथेंच व्याख्यान झोडून आला; तर वर्कशॉपसमोरच्या प्राध्यापकाची पोरगी, प्रियकर फिरतीवर जातांच दुसऱ्याबरोबर सिनेमाला गेलेली दिसली नि ह्यानें लगेच तिला ताकीद दिली. श्रीमती कुलकर्णी म्हणून कुणी विदुषी नवऱ्याला सोडून राहते, उर्मिला दिवाण नांवाची बी. टी. ला आलेली तरुणी प्रियकराला फसवून आली आहे, भगिनीसमाजांत प्रेमाची थट्टा होते--जिथें जिथें मधुसूदनला

वचनभंगाचा, विश्वासघाताचा वास आला तिथें तिथें कसलाहि विवेक न ठेवतां तो शासन करायला धांवून गेला.

असा हा मधुसूदन म्हात्रे. देखणा पण दुःखी. धंद्यांत यशस्वी व प्रेमांत अयशस्वी. वेणूवर अजूनहि प्रेम करणारा व समाजांत कुठेंहि वेणूसारखं उदाहरण दिसलं कीं आकांत करणारा ! त्याच्या अशा वागण्यानें कधीं हंसूं येई, कधीं चीड येई. पण त्याचा प्रामाणिकपणा व प्रेमभावनेवरील त्याची श्रद्धा पाहून विस्मय वाटे. आजकाल असं उत्कट प्रेम विरळं; आणि प्रेमभंगाची अशी भयंकर जखमहि एखादीच. ती पाहून वाटतं कीं प्रेम करणं नको; आणि केलं तर प्रतारणा अगदीं नको !

× × ×

उर्मिला दिवाणकडे तो गेला तेंदेखील अशाच तिरीमिरीनें ! जें वेणूनें केलं, जें इतर बऱ्याच मुली करतात, तेंच बी. टी. च्या अभ्यासासाठीं आलेल्या, एकटया राहणाऱ्या व सालस समजल्या जाणाऱ्या दिवाण नांवाच्या तरुणीनें केलं होतं. आर्. टी. ओ. च्या कचेरींत कामासाठीं मधुसूदन गेला होता, तिथें गप्पा मारतांना कुणीतरी सहज मिस् दिवाणची हकीकत सांगितली, अन् ती ऐकतांच मधुसूदन तिडीक येऊन तसाच तिच्या बिऱ्हाडीं गेला. तिला अद्वातद्वा बोलावं, शरमिंदं करावं, ह्यासाठीं त्याचं जखमी हृदय गुरगुरत होतं आणि बंद दारावर तो जोरजोरानें धक्के देत होता.

बऱ्याच वेळानं दार उघडलं गेलं. उर्मिला स्नानगृहांत होती त्यामुळें तिला यायला वेळ लागला. दारावर कुणी थाप मारीत आहे हें लक्षांत आल्यावर तिनें नळ बंद करून कानोसा घेतला. थापा वाढतच होत्या. दूधवाला, टपालवाला, शेजारचा बाळू, वर्गांतली कुमुद कामत — ह्यांपैकीं कुणीच नसावं ह्याची तिला खात्री होती. कोण असावं हें तिच्या ध्यानांत येईना. तिनें तशीच साडी गुंडाळली व केस सारखे केले. धक्के वाढतच होते. ‘ आलें -- आलें, कोण आहे ? ’ असं उद्गारत ती कुंकवाची बाटली घेऊन दाराशीं धांवली. दार उघडून पाहते तों कुणी अनोळखी तरुण ! अनोळखीच कुणी असेल अशी कल्पना असूनसुद्धां ती तशा अवतारांत गेली होती. परंतु हा परका तरुण पाहतांच मात्र तिचा विलक्षण गोंधळ उडाला.

मधुसूदन तिची स्नानगृहांतून आल्यामुळें दिसणारी जरा सात्त्विक, जरा उन्मादक आकृति पाहून मुळींच भांबावला नाहीं. शेलाटी यष्टि, अतिशुभ्र वर्ण, काळेशार डोळे, खूप कुरळे नि खूप लांब केंस—सौंदर्याच्या त्या अस्सल मुशीच्या दर्शनानें तो जराहि भारावला नाहीं. उलट तें सौंदर्य पाहून त्याला शापवाणी स्फुरूं लागली. स्वतःला सांवरीत तो म्हणाला,

“आपण मिस् दिवाण ना?—माझं नांव म्हात्रे. माझं काम आहे आपल्याशीं.—” कांहींच न बोलतां ती बया तशीच बघत उभी राहिलेली पाहून तो म्हणाला, “आपल्याला ही जागा ज्यानें मिळवून दिली त्या चित्रेनें,—त्यांचा मी स्नेही आहें.—त्यानें सांगितलं. माझं जरा काम आहे—”

अर्धवट दार उघडून उभी असलेली उर्मिला भानावर आली. वेड्यासारखं आपण बघत राहिलों ह्याची तिला लाज वाटली. पुन्हां ती भांबावली. कशीबशी म्हणाली, “चित्र्यांच्याकडून आलांत आपण? या ना आंत, काय काम आहे?—”

तिच्या मागोमाग मधुसूदन आंत गेला. त्या खोलींतली टापटीप, सजावट, आरसा, पलंग पाहून त्याला घृणा आली. एका तरुण जीवाला वनवासी करून ही कुलटा इथें नाटकांतल्यासारखा संसार थाटते ह्याची त्याला चीड आली.

दाराजवळच्या खुर्चींत मधुसूदन बसतांच उर्मिलेनें विचारलं, “काय काम आहे? चित्र्यांचा निरोप आहे कांहीं? जागा तर परत मागत नाहींत ना?”

“जागा मागत नाहींत. पण तुम्ही ही जागा सोडाल तर बरं होईल!”

“म्हणजे?”

“तुम्ही इथं आलांत कशाला? बी. टी. चं निमित्त करून जळगांव सोडलंत, कीं जयरामला टाळण्यासाठीं—”

उर्मिलेची भांबावलेली मुद्रा पाहून मधुसूदनाला कसलंसं खोल समाधान वाटलं. उजळलेल्या चेहऱ्यानें तो आवाज चढवीत म्हणाला,

“जयराम साठ्यांची कटकट नको म्हणून तुम्ही इकडे आलांत! त्यांच्याशीं तुम्ही वर्ष-दीड वर्ष स्नेह ठेवलांत, लोभ दाखवलांत; त्यांनीं तुमच्यावर एकनिष्ठ प्रेम केलं. आणि आतां निर्लज्जपणें त्यांना फसवून—”

“शट् अप्!” उर्मिला बळ एकवटून ओरडली. हा परका, गुंड इसम

घरांत शिरून आणिक काय करणार हें तिला कळेना. " बाहेर व्हा. लाज नाहीं वाटत वाटेल तें बोलायला ? माझ्या खाजगी गोष्टींशीं काय संबंध तुमचा ? कोण तुम्ही ? "

" कोण तुम्ही ? " मधुसूदन स्वतःशीं अर्धवट हंसत उठला. पण मग त्याची मुद्रा परत गंभीर झाली. " मी कोणी का असेना, तुम्ही कोण आहांत हें मला, साऱ्या जगाला कळलं आहे. जगाला कळलं नसेल तर मी ओरडून सांगेन, कीं ह्या भयंकर बाईपासून सावध रहा ! तुम्ही इथून जाईपर्यंत, जयरामाकडे जाई-पर्यंत सारखा ओरडत राहीन.—थांबा, जातों मी; पण लक्षांत ठेवा. एका गरीब तरुण हृदयाचा चोळामोळा करण्याचा खेळ खेळूं नका. अजून वेळ गेली नसेल. अजून परत जा– परत जा —"...

वर्कशॉपमधल्या मोडक्या मोटारसायकलींच्या मध्यें मधुसूदन म्हात्रे डोकं धरून बसला. आसुरी आनंदानें अन् सदा छळणाऱ्या विषण्णतेनें त्याचं हृदय गलबलून गेलं होतं. तरुण मुलामुलींचा अधःपात थांबविण्यासाठीं तो धाडस करीत होता, पण अधःपात तर वाढतच होता आणि मधुसूदनचं वागणं वेडगळ ठरलं होतं. मनाला शांत करण्यासाठीं त्यानें आपली ' इंडियन ' गाडी काढली व पुणें–मुंबई मार्गावर तो अफाट वेगानें धांवूं लागला...

आठएक दिवसांनीं एका संध्याकाळीं मधुसूदन काम संपवून खोलीवर परतत होता तेव्हां बी. टी. विद्यालयाच्या प्रवेशद्वारांतून बाहेर पडत असलेली उर्मिला दिवाण त्याला दिसली. तिची आकृति पाहतांच त्याच्या कपाळावर आंठी उमटली. ती वर्गांतल्या एका विद्यार्थ्याबरोबर हंसतखिदळत चाललेली पाहून त्याचं हृदय धगधगलं. लंडनच्या कुठल्यातरी उद्यानांत वेणू आपल्या पतीसह अशीच क्रीडा करीत असेल असा विचार त्याला टोंचून गेला. त्यानें गाडी थांबवली तेव्हां उर्मिलेला निरोप देऊन तो तरुण रस्ता ओलांडायच्या बेतांत होता.

" अहो मिस्टर, जरा एक मिनिट —" खुळयासारखं बघणाऱ्या त्या बी.टी. वाल्याला खुणावीत मधुसूदन म्हणाला. भुंवया उंचावीत व पुस्तकं सांवरीत तो मधुसूदनकडे आला नि म्हणाला,

" मला हांक मारलीत ? तुमची कांहींतरी चूक —"

"चूक नाहीं, बरोबर आहे. मघांशीं मिस् दिवाणशीं तुम्हीच बोलत होतां ना ?"

"हो. कां ?"

"ती तुमच्या नात्याची नाहीं ना ? असली तरी जपून वागा. एका तरुणाला फसवून ती इथं शिकायला आली आहे. जी एकाचा सहज घात करते ती कुणाचाहि, तुमचाहि नाश करूं शकेल. बिवेअर ऑफ दि विच्."

तो इसम उलटून कांहींच बोलला नाहीं. त्याच्याशीं तंटा करायचा अगर त्याला उपदेश करायचा मधुसूदनचा बेत ओसरून गेला. तो उद्विग्न झाला. उर्मिलेला नकटं करायला, इथलं आयुष्य नकोसं करायला, तिला पश्चात्तापानं पोळत ठेवायला तो अधिकच उतावीळ झाला...

मग बी. टी. कॉलेजच्या भेटेल त्या माणसापाशीं मधुसूदन उर्मिलेची निंदा करूं लागला. विद्यार्थी, शिक्षक, ग्रंथपाल अन् कांहीं विद्यार्थिनींदेखील...' ही अत्यंत सुंदर, साळसूद दिसणारी दिवाण मुलगी उफराट्या काळजाची आहे. तिच्याच शाळेंतल्या जयराम साठे नांवाच्या शिक्षकाला अनेक भुलथापा देऊन तिनें नादीं लावलं, अन् कंटाळा आल्यावर त्याच्याकडे पाठ फिरवून ही बी.टी.चे धडे घ्यायला इकडे आली. प्रेमाचे खेळ खेळणाऱ्या, तरुणांच्या आयुष्याचा सत्यानाश करणाऱ्या लांसवट स्त्रीचा नमुना आहे ती. तिच्यावर बहिष्कार घाला. तिला महारोग्यासारखी वागवा!...' बी. टी. विद्यालयाचे लोक, मॉडेल कॉलनींतले रहिवासी, ग्रंथालय, वनितासमाज — सर्वत्र मधुसूदन तिच्याबद्दल रान उठवूं लागला. अन् रोज ज्या बसस्टॉपवर उतरून उर्मिला घरीं जाई तिथें उभें राहून तिला आपल्या पापाची जाणीव करून देऊं लागला. आपल्या रूपानें तिला जयरामचं दर्शन व्हावं, पापाची जाणीव व्हावी, आणि अवमानित, अधोवदन, अंतर्मुख होऊन तिचं मन कावरंबावरं व्हावं, कोलाहलत उठावं, ह्यासाठीं तो धडपडूं लागला...

एक दिवस मात्र बसमधून उर्मिला उतरली नि तोंड फिरवून निघून न जातां जरा दूरवर हाताची घडी घालून उभ्या असलेल्या व कुत्सितपणें पाहणाऱ्या मधुसूदनच्या दिशेनें गेली व त्याच्यासारखीच हातांची घडी घालीत म्हणाली, "कां हो तुम्ही माझ्या पाळतीवर असतां ?"

उर्मिला कधींतरी आपल्याला जाब विचारील, कदाचित् स्वतः पुढाकार न

घेतां मित्राकरवीं किंवा पोलिसांकरवींहि आपली संभावना करील, अशी मधुसूदनची कल्पना होतीच. तो अशा प्रसंगाला तयारच होता. पण आज अकस्मात् ही येते नि सरळपणें विचारते, ' कां हो तुम्ही माझ्या पाळतीवर असतां ? ' हें पाहून तो चमकला.

क्षणार्धांत त्यानें स्वतःला सांवरलं नि म्हटलं, " मी पाळतीवर असतों ? हुंः — तुमचं पाप तुमच्या पाळतीवर असतं, पाठलाग करतं. जयरामला फसवल्यानं—! " तो बोलतांबोलतां थांबला. भोंवतालीं लोकांची बससाठीं धांवपळ चालू होती आणि उर्मिलेचे पोळलेले डोळे त्याच्याकडे टक लावून होते. इतक्या दिवसांत आज प्रथमच त्याला वाटलं कीं, भररस्त्यावर असं बडबडणं असभ्य ठरण्यासारखं आहे. तेवढ्यांत आणिक एक बस आली. चारपांच जणं धांवत आले. मधुसूदन त्यांना वाट द्यायला दूर झाला, उर्मिलेला हालावं लागलं, आणि तीं दोघं अभावितपणें, जोडीनें चालूं लागलीं.

आतां उर्मिलाच बोलूं लागली, " तुम्हांला पोलिसच्या ताब्यांत देणं फारसं कठीण नाहीं.— हंसूं नका, तुम्हीं गेले दोन महिने जी गुंडगिरी चालवली आहे, माझ्यासंबंधीं खोट्यानाट्या कंड्या उठवल्या आहेत—"

" खोट्यानाट्या ? जयराम साठे—"

" काय माहीत आहे तुम्हाला त्यांच्याबद्दल ? "

" सगळ्या जगाला —"

" जगाला कांहीं ठाऊक नाहीं. जगाला असल्या गोष्टी पूर्ण ठाऊक असतात होय ? "

" जगाला सर्व हकीकतीची जरूरी नसते. त्याला एवढं नीट कळतं कीं, ह्यांत प्रतारणा आहे, विश्वासघात आहे. "

" जगाला नाहीं, पण तुम्हाला मात्र विश्वासघात दिसणार !—तुमची ही विकृति कळलेली आहे मला. म्हणूनच मीं पोलिसांत कळवलं नाहीं. गप्प राहिलें, नि आज—"

मधुसूदन एकदम थबकला. उर्मिलेकडे अन् मग जणूं जगाकडे भकासपणें पाहात तो जवळजवळ ओरडलाच, " माझी विकृति ? — आणि प्रेमभावनेची चेष्टा करणारे, केंसांनीं गळे कापणारे तुम्ही संभावीत ? "

उर्मिला दचकली. हलकेंच म्हणाली, " तमाशा नको. तुम्हाला दुखवावं असा माझा हेतु नव्हता."

मधुसूदन जरा भानावर आला. कपाळावरचा घाम पुसत म्हणाला, " हो, पण तुम्हाला दुखवावं असाच माझा हेतु होता, अजूनहि आहे...."

" तुमचा हेतु कळला, पण त्याचा उपयोग काय ? "

" उपयोग हाच कीं, तुम्हाला तुमचं मन खात राहावं, पापाचा चटका बसत राहावा. समाजांत तुमच्याबद्दल कुजबुजलं जावं. तुम्हाला टाळलं जावं ! "

ह्यावर उर्मिला उलटून बोलली नाहीं. मधुसूदन मूक झाला. दोघंहि शून्यपणें चालूं लागलीं.

घरापाशीं पोंचतांच उर्मिला म्हणाली, " बरं आहे, ह्यापुढें मला त्रास देत जाऊं नका. तुमचं म्हणणं मला कळलं आहे. माझी चूक असेल तर कधीं ना कधीं तरी मला पाश्चात्ताप होईल. दुसऱ्याचं आयुष्य उजाड करून सुखी होणारी मी नाहीं. परंतु—"

त्या गूढ वाटणाऱ्या स्त्रीचे ते शब्द, घोगरा स्वर व पाणावलेले डोळे पाहतांच मधुसूदनला जखमेवर फुंकर घातल्यासारखं वाटलं. वाटलं कीं ह्या मुलीला शिव्या देण्यापेक्षां समजून, आर्जवून सांगितलं, तर कदाचित् ही मार्गावर येईल...अतिशय काकुळतीनें तो म्हणाला,

" मी तुमच्या वाटेस जाणार नाहीं. पण तुम्ही माझं ऐका. जयरामला शब्द दिला असाल तर वाटेल ती किंमत द्या, पण वचन मोडूं नका. एकमेकांवर आरोप करणं, दुसऱ्याला दोष देणं, वैगुण्यं काढणं, सबबी सांगणं हें भांडणानंतर नेहमींच होत राहतं. त्यांत अर्थ नसतो. तें टाकून मन मोठं करा नि त्याच्याकडे परत जा. प्रियकराकडे आपणहून जाणं ह्यांत कमीपणा कसला ? कशाला त्याचा गळा कापतां नि खोट्या सुखाच्या मागं लागतां ? खरं प्रेम एकदांच होतं. तें भाबडं असेल, अविचारी असेल, विकारी असेल, तरी तें प्रेमच असतं ! नंतरचीं प्रेमं म्हणजे तडजोड, नाइलाज, स्वार्थ असतो. प्रेम करण्याचं, प्रेम मिळवण्याचं भाग्य तुम्हाला लाभलं आहे, तें लाथाडून नि जन्मभर जळत राहूं नका. तुमचा जयराम तिकडे तळमळत असेल, आयुष्य उध्वस्त करून भ्रमिष्टासारखा हिंडत असेल,—त्याच्याकडे जा ! तोच अखेर तुम्हांला सुख देईल...ऐका माझं उर्मिलाबाई—"

उर्मिलेचा उतरलेला चेहरा व भरलेले डोळे मधुसूदननें पाहिले नि तो भांबावला. क्षणकाल उर्मिलेनें त्याच्याकडे पाहिलं नि मग तिची दृष्टि खालीं गेली. न बोलतां ती वळाली नि घरांत गेली. खोलीचं दार उघडून परत आंतून धाडकन् लावल्याचा आवाज आला. आंत जाऊन जयरामच्या आठवणींनें रडत ती पलंगावर पडली असेल हें मधुसूदननें कल्पनेनं ताडलं. तो बराच वेळ बाहेर, भररस्त्यावर उभा होता. उर्मिलेचे अश्रु पाहून त्याला आनंद झाला होता नि वेणूच्या आठवणीनं त्याचे डोळे ओलावत होते...

उर्मिला गेली. दुसऱ्याच दिवशीं निघून गेली. पंधरवड्यावर सहामाही परीक्षा आली होती ती टाकून गेली नि दिवाळीची सुट्टी संपली तरी परतली नाही. चित्रे कुणाजवळ म्हणाले म्हणे, कीं ती जागा सोडणार आहे. कुणाला बातमी समजली कीं तिकडेच ती लग्न करणार आहे. मधुसूदनला हें ऐकून आनंद वाटे. उत्साहाच्या त्या भरांत त्यानें कारखान्यासमोरच्या प्राध्यापकाच्या पोरीला वाईट वर्तनाबद्दल पुन्हां एकदां दम दिला. आपल्या वागण्याबद्दल मित्रांशीं पुन्हां एकदां अटीतटीचा वाद घातला. कुणीं कांहीं ऐकलं नाहीं तरी उर्मिला दिवाण नांवाच्या स्त्रीनें आपलं मानलं ह्या आनंदांत व वेणूच्या स्मृतीच्या आगींत तो एक महिना जगत राहिला...अन् मग एका सकाळीं उर्मिला अचानक त्याच्यासमोर उभी ठाकली !

मधुसूदनचा प्रथम स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. उर्मिला केव्हां आली, इथें कां आली, त्याला कळेना. तिच्या चेहऱ्यावर वेदना आहे कीं समाधान आहे, हें त्याला हेरतां येईना. हातांतलीं हत्यारं टाकून तो म्हणाला,

"केव्हां आलांत ? जळगांवला गेलां होतां ना ?"

"हो. अन् तिथून मग वर्धा, नागपूर, उमरावती, अकोला असा दौरा करून आलें. कालच आलें."

कारखान्याच्या पोऱ्यानं स्टूल आणून दिलं, त्यावर ती बसली. मधुसूदन तसाच मोटारसायकलच्या पिलियन्‌वर टेकला नि म्हणाला,

"कुणी म्हणत होतं तुम्ही कायमच्या गेलांत. कोर्सहि सोडलांत अन् जागाहि—"

"छेः छेः" उर्मिला घाईनें म्हणाली अन् दुसरीकडे बघूं लागली. कांहींतरी

उर्मिला पहिल्या टर्मप्रमाणें आतांहि कॉलेज संपल्यावर बसमधून घरीं प
पण आतां बसस्टॉपजवळ तिरस्कारानें पाहणारी मधुसूदन म्हात्रेची मूर्ति ति
दृष्टीस पडत नसे. तिच्यामागचा त्याचा जाच संपला होता. पण त्याची ति
सारखी आठवण येई. कॉलेजमधल्या मुलांत अगर समाजांतल्या स्त्रियांच
त्याचा फारसा उल्लेख होत नसे. एकदां कुणा पारशी मुलीबद्दल त्यानें भां
केलं, एवढी निसटती गोष्ट कुणी बोललं. बाकी सारा शुकशुकाट. तो शुकशु
उर्मिलेला उदास करूं लागला. आपली उदासीनता, अस्वस्थता जयराम
आहे असं ती मनाला समजावण्याचा यत्न करी. पण तिला मधुसूदनची ज
जास्त आठवण येई. जखमी सिंहासारखा तो पुरुष तिला भररस्त्य
बसस्टॉपवर, दारांत, न्हाणीघरांत सर्वत्र दिसे अन् म्हणे, ' खरं प्रेम एक
होतं. तें न लाथाडतां जयरामकडे जा '...मनाचा अगदींच चोळामोळा ह
लागे तेव्हां ती दूर, शहराच्या दुसऱ्या दिशेला, शांत अशा जागीं फिराय
जाई.........

एकदां एका संध्याकाळीं रेसकोर्सच्या रेलिंगला टेंकून ती अशीच उ
होती. तों मधुसूदन तिला अचानक दिसला. रेसकोर्सला वळसा घालून साव
मोटार चालवणारी त्याची बेदरकार मूर्ति दिसतांच न राहवून तिनें हात उंचाव

तो गाडी थांबवून पाहूं लागला. ओळख पटल्यावर उतरला नि जवळ
आश्चर्यानें म्हणाला, " मीं ओळखलंच नाहीं एकदम ! इकडे कुठें ? "

" तुम्ही इकडे कुठें ?– "

" कंटाळा आला म्हणून सहज आलों. मोटारहि मिळाली एकाची. "

" मी रोज संध्याकाळची इकडे येतें. "

दोघंहि रेलिंगला कोपरं टेंकून जवळजवळ उभीं राहिलीं नि गवत माजलेल
रेसकोर्सच्या पटांगणाकडे पाहूं लागलीं. अगदीं निश्चल, शांत. जणूं तिथें आ
रेसच सुरू होणार होती.

" अभ्यास कसा चाललाय् ? "

" छान. खूपच करावा लागतो. आतां लक्षहि लागूं लागलंय्. "

" अभ्यासानें तुम्हाला विसर पडेल साऱ्या गोष्टींचा. "

"कुणास ठाऊक! —तुमचा काय अनुभव आहे?" उर्मिलेनें दबकत विचार

तिच्या प्रश्नानें मधुसूदन दचकला. तिच्याकडे विचित्रपणें पाहूं लागला. दोघांचीं हृदयं घोड्यांच्या टापा उधळल्यासारखीं धडधडलीं.

मधुसूदनच्या मनांत कटुता वाढूं नये म्हणून उर्मिला म्हणाली, " निदान अभ्यासानें मन निवेल असं वाटत नाहीं. पुस्तकं घेऊन एकटं बसलं कीं मनांत भुतं गोळा होतात. वाचन नि एकान्त हा वाईटच. कुणाचा तरी आधार, सहवास असला तरच विसरायला होतं. "

" सहवास ? तुमची मैत्रिण कुमुद आहे ना ? खेरीज कॉलेजचे नि वनिता-समाजाचे लोक आहेत कीं. ही एक टर्म संपून घरीं गेलांत कीं—"

" हे लोक कसले ? त्यांना साऱ्या गोष्टींची पूर्ण कल्पनाहि नाहीं. तुमच्या-शिवाय—"

" मग माझ्याकडे येत चला ! मीं तर मागेंच म्हटलं होतं. संध्याकाळीं सहा वाजतां मी कारखाना बंद करतों. मग सात-साडेसातपर्यंत मोकळाच असतों."

त्याचे शब्द, त्याचं आमंत्रण उर्मिलेच्या हृदयावर कांटा फुलवून गेलं. मधुसूदनचा हात धरावा असं तिला एकाएकीं वाटलं. पण तो ' जयराम ' असं बजावतो आहे असं तिला भासलं नि तिनं स्वतःला सांवरलं. त्यानें कुठल्या भावनेनें आपल्याला बोलावलं हें पाहायचं राहून गेलं ह्याची तिला हळहळ वाटली. आतां मधुसूदन मोटारकडे वळला होता नि तिला बोलवीत होता.

" चला, रात्र पडायच्या आंत तुम्हाला पोंचवलेलं बरं.—"

ती त्याच्या शेजारींच बसणार होती, पण त्यानें मागचं दार उघडलं नि तिला मागें बसावं लागलं. तिचं मन खट्टू झालं. "तुम्ही भेटलांत, बरं झालं." तो मोटार सुरू करीत म्हणाला. ती तशीच बसून राहिली. आपलं वेडं मन आंवरलं पाहिजे, ह्या पुरुषाला टाळलं पाहिजे, असं तिला वाटूं लागलं....

पांचसहा दिवस उर्मिलेनें आपलं मन आंवरलं. पण मग चित्रे एकदां भेटले तेव्हां सहज म्हणाले, कीं मधुसूदन तिची फार आठवण काढीत होता. अन् हें कळतांच कॉलेज सुटल्यावर ती त्याच्या कारखान्याकडे गेली.

तो जणूं तिची वाट पाहात होता असं तिला वाटलं. कारण ती येतांच काम टाकून तो पुढें झाला. पूर्णहास्य करीत म्हणाला, " आज वेळ झाला यायला !"

पेट्रोलचा दर्प येत होता म्हणून ती अंमळ बोलली नाहीं. मग स्टुलावर बसत म्हणाली, " तुम्हीं वाट पाहिलीत ? "

घोटाळा झाला आहे हें मधुसूदननें ताडलं व तो अस्वस्थ झाला. धीर करून म्हणाला,

" भेट झाली ? "

तोंड तसंच फिरवलेलं ठेवून उर्मिलेनें मान डोलावली. त्याला वाटलं, ती रडते आहे. तो कांहीं बोलणार तेवढ्यांत ती मान वळवून कोरड्या डोळ्यांनीं म्हणाली,

" मी त्याच्याकडे गेलें होतें. तुमचं ऐकून म्हणा, अगर माझं मन सारखं खात होतं म्हणून म्हणा, त्याचे पाय धरायला गेलें. पण — पण त्यानं मला ठोकरून लावलं."

" रागावला असेल तो ! तसंच —"

" मीं शिकस्त केली. पण खरं म्हणजे तोच खेळला होता माझ्याशीं."

" असं कसं ! अजून —"

" आधींपासून तो एका मुलीशीं लघळपणा करीत होताच. तिच्याशींच त्यानें परवां लग्न लावलं."

उर्मिलेनें थेट त्याच्या डोळ्यांत पाहिलं. मधुसूदनची वाचा गेली. आपलं ऐकून उर्मिला गेली, आपल्या प्रियकराकडे पश्चात्ताप होऊन धांवली, आणि त्यानें मात्र तिला लाथाडून दुसरीशीं संबंध जोडला — ह्या साऱ्या घटनेनें तो सुन्न झाला. त्याला उर्मिलेकडे बघायची लाज वाटूं लागली.—अन् मग क्षमायाचनेच्या दृष्टीनें तो तिच्याकडे बघूं लागला. उर्मिला डोळ्यांतलं पाणी पुन्हां पुन्हां मागें सारून सभोंवतीं पसरलेल्या मोटारच्या सुट्या यंत्रांकडे पाहात राहिली.

अखेर ती उठत म्हणाली, " जातें मी. "

" जातां ? — पुन्हां या. "

" पुन्हां येईन. "

मधुसूदनच्या डोळ्यांपुढें अंधेर दाटला. जणूं ती त्याच्याकडे पश्चात्ताप होऊन आली होती, पदरीं घ्यायला विनवीत होती, आणि त्यानें तिला धुडकावून लावलं होतं. त्याला वाटलं, तिला थांबवावं. त्याला वाटलं, साऱ्या जगाला ओरडून सांगावं कीं उर्मिला दिवाण वाईट नाहीं. तिला बोल लावूं नका, हंसूं नका...

भाबडेपणानें तो म्हणाला, " खरं म्हणजे वाट पाहिली. एकदां वाटलं, बसस्टॉपशींच जावं. पण मागची आठवण झाली नि —"

सगळं दुःख नि दूरत्व विसरून त्यानें असा स्नेह, सलगी दाखवावी हें पाहून ती शहारून गेली. म्हणाली,

" इश्श ! मी विसरूनहि गेलें. खरंच, कां नाहीं आलांत स्टॉपवर ? "...

मग तो रोज संध्याकाळीं स्टॉपवर जाऊन उर्मिलेला उतरून घेऊं लागला. कॉलेज सुटल्यावर रोज तास दीडतास कारखान्यांत मधुसूदनशीं गप्पा मारायचा उर्मिलेचा कार्यक्रम सुरू झाला. मोटारसायकलच्या मेकपासून शेली – कीटस्‌च्या काव्यांपर्यंत अनेक विषयांवर तो गप्पा मारी अन् तिच्या आईवडिलांची नि वह्या-पुस्तकांची देखील आस्थेनें चौकशी करी. एकदां तर बी. टी. च्या एका मुलीसंबंधीं कांहीं कळलं तेव्हां तिला समज द्यायची कामगिरी त्यानें उर्मिलेवर सोंपविली...

एक महिना असा मैत्रींत गेला, तेव्हां एका संध्याकाळीं उर्मिलेनें दूर भटकायला जायचा बूट काढला. मधुसूदनच्या मोठ्या ' इंडियन ' च्या मागें बसून ती गांवांतून मिरवत गेली. त्याच्या आधारानें, त्याच्या गाडीवर बसून, भरधांव वेगानें क्षितिजाकडे जाण्याचं आगळं सुख तिनें अनुभवलं ! अन् दूर, एकान्तांत, एका उद्यानांत आल्यावर त्याला म्हटलं,

" मधुसूदन, तुमची प्रेमकहाणी ऐकण्याची माझी फार इच्छा आहे. आपण आतां खूप मित्र झालों आहोंत. मला सांगायला --"

" नको, मिस् दिवाण. तेवढं मला विचारूं नका --"

" कां पण --? "

" क्लेश होतात, फार क्लेश होतात. जुन्या स्मृतींना शब्दरूप दिल्यानं इतरांना बरं वाटत असेल; पण मला फार त्रास होतो. त्यांतून तुम्हांला सांगायला तर फार कष्ट पडतील.-- "

" मला सांगायचं संकट कसलं त्यांत ? "

" कारण आपण थोडींशीं समदुःखी आहोंत. "

" म्हणून तर सांगा म्हटलं. मी तुमचं दुःख हलकं करीन. "

" तें कसं शक्य आहे ? विसरा ना सारं ! मीं कधीं अधिक विचारलं का तुमच्याबद्दल ? हीं दुःखं आपापलीं एकेकट्यानं भोगायचीं असतात.--"

" पण तुमच्या संगतींत मला माझ्या दुःखाचा विसर पडतो. "

" थँक् यू ! "

" तसा — तसं —" उर्मिला पुढचं बोलूं शकली नाहीं. हृदयांतलं, ओंठांतलं उच्चारायचं बळच येईना तिला. मधुसूदनची त्रस्त, दुःखी, पोळलेली, भकास मुद्रा पाहून तिला तें बोलावं कीं ती मुद्राच न्याहाळीत राहावं हें कळेनासं झालं.

उद्यानांतल्या बांकावर दोघेंहि कुंडींतल्या निवडुंगांसारखीं मख्खपणें बसलीं बसलीं नि अखेर घरीं परतलीं. घराशीं उतरतांना उर्मिलेनें कमालीच्या मार्दवानें विचारलं, " रागावलांत ? "

" छेः छेः ! रागवायचं कशाला ? "

दोघेंहि हंसलीं. मधुसूदन गाडीवरून गेल्यावर उर्मिला घरांत गेली अन् अश्रु ढाळूं लागली. मधुसूदनचा वेदनांच्या रेषांनीं भरलेला गोजिरा चेहरा पुन्हां पुन्हां आठवत रात्रभर बसली. त्याच्या शब्दांचा, नजरेचा, हालचालींचा काय अर्थ असावा हें शोधीत राहिली. कुठलंहि उत्तर मिळालं तरी तिचं दुःख वाढतच राही. आणि तिच्या मनींचं कोडं अधिकच अवघड होई...

— चार रात्रीं असं जागरण केल्यावर तिनें निर्धार केला आणि स्पष्ट नि छोटं पत्र लिहिलं. ' तुमचं दुःख समजून घेणारी, त्यासह तुमचा स्वीकार करूं इच्छिणारी ' अशा मंगळसूत्राच्या वाट्यांसारख्या व ओंवलेल्या मण्यांसारख्या शपथांनीं नटलेलं पत्र ! तिला एकवार वाटलं कीं पत्र नकोच ! तें पत्र अखेर दुःखच परत देणार आहे ! पण आज बरेच दिवस चाललेल्या कोंडमाऱ्याचा कांहींतरी शेवट करणं आतां भागच होतं.

तिनें स्नान केलं, पण प्रसाधन केलं नाहीं. कॉलेजला गेली, पण ग्रंथालयांत डोकं धरून बसली. आणि संध्याकाळीं बसमधून उतरल्यावर मधुसूदन भेटला तेव्हां त्याला म्हणाली,

" आज मी येत नाहीं ! हें — हें पत्र आणलंय् तुमच्यासाठीं."

" म्हणजे ? " पत्र घेत तो चकित होऊन म्हणाला.

" इथें उघडूं नका. घरीं जाऊन वाचा."

मधुसूदनकडे पाठ फिरवून ती गेली. घरांत शिरतांच वह्यापुस्तकं पलंगावर टाकून तीहि पलंगावर पडली...काय होणार ? कांहीं तासांनीं ? आज

रात्रीं ? उद्यां सकाळीं ? कांहींतरी होणारच, पण...डोकं फारच फिरायला लागलं तेव्हां ती स्नानगृहांत गेली.

तेवढ्यांत दार खडखडलं. डोक्यावर धरलेली पाण्याची धार थांबवून तिनें कानोसा घेतला. दारावर थापा वाडत होत्या. ह्या वेळीं कुमुदनें अगर शेजारच्या बाळूनें यावं ह्याचा तिला राग आला. थापा कमी होईनात तेव्हां ती दचकली नि धांवली. 'हो—आलेंच' म्हणत तिनें दार उघडलें. मनांतली मूर्ति पुढ्यांत पाहून तिला भय वाटलं.

मधुसूदन अर्धवट उघडलेल्या दारांतून जेमतेम आंत आला. हातांतली कागदाची घडी उर्मिलेच्या अंगावर फेंकीत तो तिरस्कारानें ओरडला,

"हें काय भरकटलंय् तुम्हीं ?—हें काय केलंत ?"

त्याचा बऱ्याच दिवसांनीं दिसलेला रौद्रावतार उर्मिलेनें निमिषार्धात हृदयसंपुटींत सांठवून घेतला: नि मग ती थरथर कांपत, कांपऱ्या स्वरांत म्हणाली,

"मीं—मला वाटलं तें लिहिलं—"

"हें वाटलं ? जयराम साठेची आठवण इतक्या लवकर विसरलांत ?—त्यानें केलेला घाव, त्याच्यावर तरीहि केलेलं प्रेम—सारं विसरलांत ?—अन् मी—मी उभा जळतों आहें हें माहीत असून—"

"पण तुम्हीं दाखवलेला स्नेह—"

मधुसूदन दोन पावलं मागें सरला. त्याचं तोंड तिटकाऱ्यानं भरलं नि चिडून तो म्हणाला,

"तुम्ही दुःखी होतां, माझ्या सांगीवरून अधिकच दुःखी झालांत, म्हणून सांत्वनासाठीं मीं तुम्हाला सोबत केली, मैत्री दिली. शुद्ध मैत्रीखेरीज कसली भावना बाळगली नाहीं. तुम्हाला माहीत आहे कीं, कुठल्याच स्त्रीवर मी प्रेम करूं शकणार नाहीं. श्रीमंत, सुंदर—कुणालाच माझं हृदय मिळणार नाहीं. तें वेणूच्या स्वाधीन आहे. वेणूसाठींच मी..."

"चुकलें मी. क्षमा करा—"

"तुमचं जयरामवरचं प्रेमहि खोटं नि माझ्यावरचंहि खोटं—"

"नको—नको !—"

मधुसूदन एकदम थांबला. उर्मिला रडलेली पाहणं त्याला नको वाटलं.

तिला सांगायचं तें सांगून झालं. वेणूत्ररची निष्ठा, तिच्या पश्चात् पेटलेला होम, पुन्हां एकदां प्रकट झाला; अन् तो पाठ वळवून दाण्दाण् पावलं टाकीत परतला. त्याच्या पावलांचा आवाज बंद झाला. पत्राच्या चिंध्या होऊन त्या उधळल्या गेल्या नि त्याहि कुठें नाहींशा झाल्या. उर्मिलेचे एकसारखे ओघळणारे अश्रु बऱ्याच वेळानें वाळून गेले. मग सारं संपलं, सुन्न झालं. एकटी उर्मिला उरली.

× × ×

उर्मिला दिवाण तेव्हांपासून एकाकी आहे. ऐन तारुण्यांत असलेली, लाखांत मुलींत सुंदर ठरेल अशी, बी. टी. झालेल्यांच्यांत हुषारच वाटेल अशी ती जळगांवच्या शाळेंतली शिक्षिका आपलं दुःख दाबून तशीच जगत आहे. आपण दुःखी आहोंत, दुर्दैवी आहोंत, आपला प्रेमभंग झालाय्, अगदीं विचित्र तऱ्हेचा प्रेमभंग झालाय्, हें सांगायचीहि तिला चोरी आहे.

पण ती दुर्दैवी आहे, अन् तिचा प्रेमभंग झालाय्, असं तरी कसं म्हणायचं? परतून प्रेम मिळूं नये अशी मनोमन इच्छा धरूनच तिनें प्रेम केलं; आणि ती इच्छा सफल झाल्यानें ती सुदैवीच ठरली. मधुसूदन तिच्यावर प्रेम करूं लागला असता तर मात्र ती कायमची दुःखी झाली असती...

मधुसूदन म्हात्रे प्रथम दृष्टीस पडला तेव्हांपासून ती त्याच्यावर लोभावली होती. पुरुषजातीकडे फारसं लक्ष न देणारी उर्मिला, मोटारसायकलवरून वेगांत जाणारी त्याची मूर्ति प्रथम दिसली तेव्हां रस्त्यावर थांबून पाहात उभी राहिली. मग क्षणभर चमकून गेलेलं तें पौरुष तिच्या पुढ्यांत, तिच्या उंबरठ्यांत उभं दिसलं तेव्हां ती चकित झाली नि भारावून गेली.

परंतु तो आला नि मवाल्यासारखा बडबडून गेला. उर्मिलेचं स्वत्व जागृत झालं. तिनें त्याला हांकललं नि पोलिसांकडे वर्दी देऊन त्याचा बंदोबस्त करायचं ठरवलं. पिसाळलेल्या स्थितींत ती चित्र्यांच्याकडे गेली. चित्र्यांची ओळख सांगून तो आला होता नि...पण चित्रे चिडायच्याऐवजीं गप्प राहिले. प्रेमभंग झाल्यामुळें तो तरुण असा वागतो ही त्याची विचित्र कहाणी सांगून त्यांनीं उर्मिलेला शांत करायचा यत्न केला.

उर्मिला अपमान विसरली नाहीं. पण तिच्या मनांत क्रोध धुमसूं लागला

तो तिच्याबद्दल कंड्या उठवणाऱ्या इसमांच्याबद्दल! होय, जयरामबद्दलची ती कंडीच, अफवाच होती केवळ! जयराम साठे नांवाचा कुणी माणूसच नव्हता जळगांवांत! जयराम पाध्ये म्हणून एक संगीत–शिक्षक मात्र होता; नि तो उर्मिलेच्या एका नातलग मुलीशीं लग्न करणार होता. उर्मिलेचा ह्यांत कांहीं संबंधहि नव्हता. पण अर्धवट ऐकून, कुणींतरी कांहींतरी उठवलं होतं, अन् तें अनेक वळणं घेत आर. टी. ओ. च्या ऑफिसांतून मधुसूदनपर्यंत पोंचलं होतं. तें ऐकतांच मधुसूदननें उर्मिलेच्या घरीं जाऊन दंगा केला होता; गांवभर तिची नालस्ती सुरू केली होती...

अनेकदां उर्मिलेचीं पावलं पोलिस – चौकीकडे वळत. कित्येकदां पायांतली चप्पल काढून बसस्टॉपवर उभ्या असलेल्या मधुसूदनला सडकायची तिला इच्छा होई. पण मग त्याची कहाणी तिला आठवे. वेदनेनें पोळलेला तो उमदा पुरुष पाहिला कीं तिच्या हातून कांहींच होत नसे. अत्यंत स्वाभिमानी उर्मिला कुतूहलानें, आकर्षणानें भारावली गेली. अखेर एक दिवस बसस्टॉपवर त्याला सगळं शांतपणें सांगून टाकायला म्हणून ती गेली; पण अधिकच अडकून पडली. तिच्या मनानें वेगळींच वळणें घेतलीं, आणि सारा खुलासा करण्याऐवजीं त्याचा राग, उपदेश तिनें ऐकून घेतला !...

मधुसूदनची ती भेट झाल्यापासून उर्मिला अपमान विसरली, अभ्यास विसरली, सारंच दूर सारूं लागली. एका स्त्रीवर एखाद्यानें इतकं प्रेम करावं, तिनं पाठींत वार केला तरी तिचाच ध्यास घ्यावा, प्रेमभावनेवर एवढी निष्ठा ठेवावी व त्यासाठीं साऱ्या आयुष्याचा होम करावा, हें पाहून ती शहारून गेली. मधुसूदनचे जखमी डोळे, उदास जिवणी, अस्वस्थ हालचाल, तिरीमिरीचं वागणं, ह्यांवर तिचा जीव जडला. आणि त्याच्या प्रेम करण्याच्या शक्तीवर तिचं प्रेम बसलं. आपला जीव ज्याच्यावर जडला आहे त्याचं प्रेम आपल्याला नको हें लक्षांत येतांच ती बावरली नि भिऊन जळगांवला पळाली...

जळगांव, भुसावळ, वर्धा, उमरावती, अकोला — खूप प्रवास करूनहि उर्मिलेचं ओढाळ मन भानावर येईना. ती जळगांवला गेली नि जयराम पाध्येला पाहून नवीनच कल्पना घोळवूं लागली. मग तशीच ती परतली, मधुसूदनकडे गेली, डोळयांत पाणी आणून म्हणाली, ‘ तो एका मुलीशीं लघळ-पणा करीतच होता. तिच्याशींच त्यानं लग्न केलं. ’

तिच्या अपेक्षेप्रमाणें मधुसूदन हळहळला नि तिच्या अपेक्षेबाहेर त्यानें तिचं सांत्वन केलं. दोघं समदुःखी झालीं नि दोघांची मैत्री झपाट्यानें वाढत गेली. इतकी कीं उर्मिलेला भयच वाटूं लागलं ! आपण आपलं दुःख विसरावं म्हणून तो धडपडतो आणि त्यांत वेणूची आठवण बुजवण्याचा प्रयत्न करतों कीं काय — तिला कळेना. आपण हळूहळू पण सूचकतेनें मनाचा कल जसा दाखवतों तसं तें सारं स्वीकारून तोहि त्याच्या मनाची दिशा निश्चित करतो आहे कीं काय -- तेंहि तिला कळेना. तिचं हृदय शंकाकुशंकांनीं धापा टाकूं लागलं. आणि अखेर त्याची प्रेमयाचना करून तिनें सारा कोंडमारा संपवायचा निश्चय केला...

तिचं पत्र हातीं पडतांच तो तांतडीनें आला. दारावरच्या थापा ऐकतांच तिची छाती धडधडली. वेदनेनें व्याकुळ झालेली त्याची मुद्रा अंतश्चक्षूं-पुढें नाचूं लागली नि तिला हर्ष झाला. तीच आकृति डोळयांपुढें दिसली, तिला शिव्या देत सुटली, तेव्हां ती दुःखानें हतबल झाली. तो तिच्यावर प्रेम करीत नव्हता ! वेणूवरच करीत होता. वेणूसाठींच तो जळत आहे हें तिनें हंसऱ्या हृदयानें व भरल्या डोळयांनीं ऐकून घेतलं. त्याचा रौद्रावतार, त्याची वेणूवरच्या निष्ठेची ठणठणीत ग्वाही व प्रेमभंगानें जळणारं त्याचं हृदय पाहून तिनें त्याच्या ताटातुटीचें दुःख दाबून टाकलं. तो तिला झिडकारून गेला त्यांतच तिला साफल्य सांपडलं...

होय, तेंच उर्मिला दिवाणचं साफल्य होतं ! मधुसूदन तिला हवा होता, नि नकोहि होता. तिला त्याच्यावर प्रेम करायचं होतं, पण त्याचं प्रेम नको होतं ! वेणूला विसरून मधुसूदन तिच्यावर लोभावला असता तर तिला संसार थाटतां आला असता, एक राजबिंडा पुरुष पति म्हणून लाभला असता. पण वेणूला विसरून हा आपल्याशीं रमला, हें शल्य तिला सतावीत राहिलं असतं. परंतु हक्क नसलेलं तिचं प्रीतीचं दैवत शुद्धच राहिलं आणि त्यामुळें तिची त्याच्यावरील श्रद्धा शतपटींनीं वाढली. त्याच्या अभंग निष्ठेबरोबर तिचं त्याच्यावरचं प्रेम लाखपटींनीं दुणावलं. आणि नको असलेल्या प्रियकरासाठीं ती सारा जन्म जळत राहिली...

• • •

. ७ .

# भाई

स्वप्नाळू डोळ्यांची व सुकुमार शरीराची किशोरी केळकर शाळेच्या आवारांत अधीरतेनें आली. पावसाच्या भुरभुरीनें तिचे कुरळे केस ओले झाले होते व रस्त्यावरच्या चिखलानें चपला जड झाल्या होत्या. साडी सावरीत व धापा टाकीत ती गजबजलेल्या बाजारांतून शाळेशीं आली. रविवार असल्यानें शाळेचें प्रवेशद्वार लोटून घेतलें होतें. लहानशी फट करून ती अंग चोरून आंत गेली. रखवालदार स्टुलावर बसून शब्दकोडीं सोडवीत होता. ‘काय किशोरीबाय, मेट्रनबाईची रजा काढून गेलांत नि लगेच वापस आलांत—’ तो विचारील असं वाटलं व ती झटकन् पुढें सटकली. डाव्या हातानें वर उचललेला साडीचा घोळ तिनें खालीं सोडला व उजव्या हातानें छातीशीं लपविलेली कागदाची पुडी अधिकच आवळली. पुन्हां थरथरते, अधीरे, अनोळखी कड तिच्या उरांत दाटले व ती धांवतच समोरच्या बागेकडे गेली.

बागेच्या मागें शाळेची दगडी इमारत उभी होती. डाव्या बाजूला विद्यार्थिनींचें वसतिगृह होतें. शाळेंत संपूर्ण शांतता होती, आणि वसतिगृहाच्या व्हरांड्यांत, खिडक्यांत, जिन्यांत एकाद्दुसरी मुलगी गातांना, हंसतांना दिसत होती. भारावलेल्या नजरेनें किशोरीनें दोन्ही इमारतींकडे पाहिलें व ती उजव्या दिशेच्या जुईच्या कुंजाकडे निघाली. जुईच्या छताशेजारचा चौथरा तिच्या दृष्टीला आधींच दिसूं लागला…पोलक्यांत दडवलेली पुडी बाहेर काढून ती चौथऱ्याशीं अभिमानानें उभी होती. चौथऱ्यावर बसलेल्या तेजःपुंज तरुणाच्या हातांत पुडींतलं कंकण बांधीत होती…

पण कुंजापाशीं कुणीच नव्हतें. किशोरी थबकली. थरथरली. विस्कटलेला भातुकलीचा खेळ किंवा सकाळीं चोळामोळा होणारी शय्या दिसावी, तसा तो कुंज नि त्या-

मोंवतालचं विश्व वाटलं तिला. तिची कृश काया गदगदली व टपोऱ्या डोळयांत टचकन् पाणी आलं. आपल्या भावना अशा कुस्करल्या जाव्यात ह्याचें तिला दुःख झालें. तिला वाटलं, असंच खोलींत जावं व झोपावं. नाहींतरी सगळींजणं तिला हळुवार, हळवी म्हणतातच. तिच्या मनांत ज्या अभिनव कल्पना उमलतात, त्या जगाला कृत्रिम वाटतातच, तर मग...

तेवढ्यांत पलिकडच्या भिंतीशीं खडबडलं. किशोरी दचकली. नकळत भिंतीशीं गेली. भिंतीजवळ दिसणारा तो शुभ्र, जाड बाहू तिला भारावून टाकूं लागला. त्या हातावर कंकण बांधायची तिची तीव्र इच्छा उफाळून आली. ती पुढें होऊन पुटपुटली,

" भाई...भाई..."

तिची हांक वाया गेली. घसा साफ करून ती पुन्हां म्हणाली,

" दळवी...वासंती दळवी..."

भिंतींतल्या खारीच्या घरांत हात घालणारी वासंती दचकली. वळून पाहूं लागली. निश्चल राहून व श्वास रोधून ती खारीचं पोर पकडूं पाहात होती. पण किशोरीनें तिचा विरस केला. आपले वटवटीत डोळे मोठे करीत ती क्रुद्धपणें म्हणाली,

" हें ग काय किशोरी !– चांगलं सांपडत होतं पोर तें—"

" नको ग पकडूं तो मुका प्राणी. जाऊं दे त्याला. आपण रोज येऊन पाहूं—"

किशोरी काकुळतीनें म्हणाली व वासंतीला कुंजाकडे ओढूं लागली. तिचं आडदांड शरीर ओढतांना ती घामाघूम झाली. अन् आनंदितहि ! तिचा गोवरा चेहरा, रुंद खांदे, जाड बोटं किशोरीला अति आवडलीं. पदर खोवण्याची, कपाळाला आंठ्या घालून पाहण्याची, दाणदाण चालण्याची संवय जास्तच मोहक वाटूं लागली.

कुंजापाशीं येण्याआधींच किशोरी म्हणाली, " वासंती, विसरलीस वाटतं इतक्यांत ?–तूंच मला म्हणालीस कीं, 'मी होतें तुझा भाऊ. बांध मला राखी.' म्हणून ही मुद्दाम आणली राखी. किती उत्सुकतेनें आलें धांवत ! पण तूं..."

वासंती खरं म्हणजे विसरली होती...सकाळपासून किशोरी खिन्न दिसत

होती म्हणून तिनें सहज चौकशी केली होती. तिच्या तेवढ्या प्रश्नानं किशोरीचं काळीज ढवळलं गेलं. आज राखीपौर्णिमा. होस्टेलमधल्या कितीतरी मुलींनीं भावांना चांगल्या चांगल्या राख्या दिल्या. गांवांत जाऊन भावांना बांधल्या. परगांवच्या भावांना पोस्टानें पाठवल्या. माळ्याच्या हातावरहि लाल दोरा दिसत होता. मराठीच्या भुस्कुटे बाईंचा भाऊ लढाईवर मेला होता. पण त्या त्याच्या फोटोपुढें राखी ठेवणार होत्या. सातवीच्या सुरंगा सप्तर्षींचा कुणी मानलेला भाऊ होता. त्याच्यासाठीं तिनें रुपायाची राखी तयार केली होती. अन् – अन् किशोरीला मात्र भाऊच नव्हता ! किती दुर्दैवी ती ! तिनें कुणाला राखी बांधायची ? भाऊ म्हणून म्हणायचं ? — डोळे टिपत दंवानें थबथबलेल्या कुंजांत किशोरीनं आपली कहाणी वासंतीला सांगितली. वासंतीला विशेषसं वाटलं नाहीं. तिला तीन भाऊ होते. अन् त्यांची आठवणहि नव्हती. पण किशोरीची मुद्रा पाहून ती कळवळली. एकदम म्हणाली,

‘ इश्श, त्यांत काय ? — तुला कुणीच नाहीं जगांत, असं कसं म्हणतेस ? मी आहें कीं ! मी तुझा भाऊ ! मलाच बांध राखी. खरंच बांध. मला भाऊ मान. शप्पत —’ बोलतांना तिनें हातहि पुढें केला होता...

वासंती हें सारं विसरली होती. पण आतां किशोरीचे शब्द, आतुर चर्या व हातांतली चकचकीत राखी पाहून तिला सारं स्मरलं. स्मरलं व विचित्र वाटलं. गंमतहि वाटली. हात पुढें करीत ती म्हणाली, “ विसरतें कसली ? मी वाटच पाहात होतें. बांध ना राखी, किशोरीताई ! – ”

किशोरीचा चेहरा उजळला. बंधुप्रेमाचा अमोल साक्षात्कार तिच्या हृदयांत झाला व ती नाजूक चकचकीत राखी तिनें वासंतीच्या मनगटावर बांधली. वासंती त्या राखीकडे एखाद्या दागिन्यासारखी, घड्याळासारखी पाहात राहिली. आणि तिची डौलदार, दणकट मूर्ति पाहून किशोरीचं हृदय कौतुकानें, अभिमानानें फुलून गेलं. ती वासंतीला, आपल्या भावाला, बिलगली. तिच्या -- त्याच्या — हातांत हात अडकवीत म्हणाली, “ खरंच, माझी भावाची हौस आज पुरी झाली ! मी तुला भाई म्हणणार. भाई, आपलं गुपित कुठें बोलायचं नाहीं; नि त्याची टिंगल करायची नाहीं हं !—”

× × ×

त्या प्रसंगापासून किशोरी केळकर आणि वासंती दळवी ह्यांच्यामध्यें एक नवीन, निराळं नातं निर्माण झालं. एक गुपित, एक खेळ दोघींना मिळाला व वसतिगृहांत आपण वेगळ्या आहोंत, एकमेकींच्या आहोंत, असं त्यांना वाटूं लागलं. वसतिगृहांत पहिलीपासून सातवीपर्यंत अनेक मुली होत्या. लुकड्या, लठ्ठ, भित्र्या, खट्याळ, स्वप्नाळू, शिष्ट. किशोरीसारख्या भावनाप्रधान व वासंतीसारख्या पठाण-सुद्धां! किशोरीला कुणीहि साथ करणारी हळुवार सखी मिळाली असती; अगर आधार देणारी दुसरी कुणीहि दणगट मैत्रीण मिळाली असती. पण तिचं वासंती-वरच प्रेम बसलं. द्रौपदीचं कृष्णावर असावं तसं उत्कट, अमर प्रेम!– तें प्रेम घेऊन वासंतीच्या रूपानें तिला भाऊ भेटला होता. फुलांत, फुलपांखरांत, आरशांत, आकाशांत सदा गुंगलेल्या किशोरीच्या कोमल मनाला हा नवाच चाळा मिळाला. कविता करणाऱ्या मैत्रिणींच्या मंडळांतून तिचं मन उठून गेलं. इंग्रजीच्या बाईबद्दल तिला अपार भक्ति वाटत असे, तीहि ओसरून गेली. ती पांचवींत होती व सहावी सातवींतल्या स्कॉलर मुलींबद्दल तिला कुतूहल वाटे. पण आतां तें नाहींसं झालं. केवळ सहावींतली उडाणटप्पू वासंती दळवीच तिला साऱ्या वसतिगृहांत प्यार वाटूं लागली. कधींकधीं तिला घराची, आईची ओढ लागे. वसतिगृहाच्या कैदखान्यांत तिचं मन उबून जाई. पण आतां तिच्या भाईचा तिला आधार लाभला होता.

"भाई, ए भाई रे —"

"काय ताई?"

कधीं जिन्यांत, जेवणघरांत, बागेंत वासंती एकटी भेटली कीं किशोरी तिला साद देई. वासंती थबकेपर्यंत, प्रत्युत्तर देईपर्यंत, पुकारा करी. वासंतीचें लक्ष नसे. पण किशोरीची मंजुळ हांक ऐकतांच ती हंसे. आपलेपणानें तिची चवकशी करी. वासंती हंसली, तिनें थोपटलें, समजूत घातली, कीं किशोरीला कसलासा धीर वाटे. अभिमानानें ती भाईची आकृति दुरून पाहात राही. भाई जिन्यावरून उड्या मारीत जाई. मैत्रिणींच्या पाठींत धपाटे घाली. हुतूतू पटाईतपणें खेळे. नि झोके काढी तेहि किती मोठें! भाईची तिला भीतीहि वाटे, नि अभिमानहि वाटे. सुट्टीच्या दिवशीं दुपारीं वसतिगृहांतल्या कांहीं मुलींना त्यांचे गांवांतले भाऊ भेटायला येत. ते बुशकोट घातलेले, केस वळवलेले, टक लावून पाहणारे व वेंधळे वाटणारे भाऊ बघून तिला हंसूं येई.

तिला कोणी भेटायला येत नसे. ‘किशोरी केळकर, तुझा भाऊ भेटायला आला आहे —’ अशी मेट्रनची चिठ्ठी येण्याचं तिच्या दैवांत नव्हतं. तरी पण शेकडों चिठ्ठयांपेक्षां अधिक भाग्याचं तिला भेटलं होतं. कुणाहि मुलीच्या भावापेक्षां श्रेष्ठ भाऊ तिला लाभला होता. मेट्रनच्या चिठ्ठयांकडे, त्या चिठ्ठ्या येतांच लगबगीनें धांवणाऱ्या पोरींकडे, व त्यांच्या खुज्या भावांकडे ती तुच्छतेनें पाहूं लागली. तिचं गुपीत कुणालाच ठाऊक नव्हतं! किशोरीचा हर्ष कधीं कधीं मनांत मावेनासा होई. तिला वाटे, सर्वांना ओरडून सांगावं, ‘मलाहि भाऊ आहे! तुम्हा सर्वजणींपेक्षां माझा भाऊ चांगला आहे! हा पाहा माझा भाऊ! भाई!—’

“ भाई, ए भाई रे —”

“ किशोरी, अशी तीनतीनदां हांका मारूं नकोस. कुणी ऐकेल, हंसेल. असं केलंस तर मग —”

कधीं कधीं भाई तिला दरडावी. हिडीसफिडीस करी. किशोरीला वाईट वाटे. ह्या खेळांत आपल्याइतकी वासंती रमली नाहीं ह्या जाणिवेनं ती कावरीबावरी होई. पण मग ती मनाची समजूत घाली. भाऊ असाच वागणार, बहिणींना त्रास देणार. आपणच मुलीच्या जातीनें त्याच्यावर माया करायला हवी. भाई रागावला तरी ती मनावर घेत नसे. त्याच्या भोंवतीं ती घोटाळत राही. कुणी मुलींनीं त्रास द्यायची ती वाटच पाही. कुणाविरुद्ध तक्रार करायला तिला आतां अवसान वाटे. तिचा भाई होता ना हांकेच्या अंतरावर! त्याच्यामुळें तिला आंबोळीला लवकर जागा मिळे. झाडाच्या शेंड्यावरचीं फुलें खुडून मिळत. टेबलटेनिस खेळतांना वशिला लागे. इतरांना वाटे, ह्यांची साधी मैत्री आहे, पण खरी गोष्ट...

त्या दिवशीं शाळा सुटतांच किशोरीनें धांवतच भाईला एका बाजूला नेलें. लाडेलाडें बोलत सांगितलं, “ भाई, भाई, एक गम्मत कळली आज मला. किती विचित्र–अय्या–”

“ कसली गंमत ग ––” शेपटा पुढें ओढून हातांतल्या पुस्तकांच्या गठ्ठयावर हापटीत वासंती उद्गारली.

“ कांहीं तरीच बाई. ती सुवर्णा कुळकर्णी नि मैना मराठे अगदींच ह्या आहेत. इश्श बाई —”

" अग पण झालं काय ?—" कपाळाला आंठ्या घालीत वासंती उद्गारली. किशोरीचा तिला कंटाळा आला होता. खोलींत पुस्तकं ठेवून खारीचं तें पोर पकडायची पुन्हां एकदां तिला हुक्की आली होती.

" सांगूं तुला ? " माना वेळावीत किशोरी म्हणाली, " अग मैना नि सुवर्णा म्हणे राजाराणी खेळतात. ही सारी शाळा म्हणे राज्य. आणि मैना राजा नि सुवर्णा तिची राणी ! –"

" शीः ! तुला कुणीं सांगितलं ? –"

" सुवर्णाच सांगत होती. ती म्हणते कीं —"

वासंती चरकली. घाईनें म्हणाली, " पण — — तूं बोललीस का तिला आपल्याबद्दल — — "

" छे ग, मी कसं सांगेन ! आपलं सीक्रेट आहे ना तें ? मी तें सांगेन असं वाटलं तुला ? भाई —"

वासंतीनें सुटकेचा श्वास सोडला. मग किशोरीला नेहमींप्रमाणें थोपटीत म्हटलें, " सुवर्णाच्या नादीं लागूं नको तूं !–त्या मुली मूर्ख आहेत —"

" माहीत आहे मला — — " किशोरीनें मनांत मैना–सुवर्णाशीं कट्टी केली. त्यांच्यापेक्षां तिचं भाईचं प्रेम, गुपित केवढं पवित्र, श्रेष्ठ होतं ! ती शहाणी होती. भाई तर खूपच शहाणा होता. मोठा होता. भाईच्या योग्य सूचनेनें किशोरीला समाधान वाटलं. तिला सारं कळत होतं. लहान नव्हती ती. चांगली पंधरा वर्षांची होती. मैना–सुवर्णाचं वर्तन उमगत होतंच, पण वसतिगृहांतल्या इतर अनेक गोष्टी लक्षांत आल्या होत्या. ड्रीलच्या बाईंना मूल नव्हतं नि पहिलींतल्या उपाला त्या आपली मुलगी मानीत होत्या. तिला आंघोळ घालीत, कपडे करीत, पोटाशीं धरीत, मातृप्रेमाचा सारा वर्षाव करीत ! माळी एवढा म्हातारा, पण एकदां सिनेमा पाहून आल्यापासून पिरोज भरुचालाच नर्गिस मानीत होता. त्यानें त्या नर्गिसचा ध्यास घेतला होता. अन् सर्वांत कळस म्हणजे, मॅट्रीकमधली विधवा चंद्रा चाफेकर तर...छे, ह्या सर्वांहून तिचं–वासंतीचं गुपित, प्रेम किती पवित्र, आदर्श ! वसतिगृहांतल्या साऱ्याजणींच्याहून आपण दोघी उच्च आहोंत, अशी किशोरीची समजूत पटली. बंधुप्रेमाच्या परीसस्पर्शानें तिला अस्मान ठेंगणें झालें. आपल्या भाईचं किती नि कसं कौतुक करूं असं तिला झालं !

म्हणूनच शाळेच्या संमेलनांत तिनें आग्रहानें भाईला काम करायला लावलें-नाटकांत नि टॅब्लोंत. वासंतीला वास्तविक रंगभूमीवर येण्यापेक्षां प्रेक्षकांत मागें बसून दंगा करायची अधिक इच्छा होती. पण किशोरीच्या आर्जवापुढें तिचं चालेना. तशांत किशोरीच्या सांगण्यावरून बाईंनींदेखील वासंतीची निवड केली. ' दळवी, ही केळकर म्हणते तें खरं आहे. तुला पुरुषपार्ट चांगला शोभेल. नाटकांत काम करच; पण ह्या 'भरतभेट'च्या टॅब्लोंतहि तूं हवीस —' बाईंचं फर्मान आल्यावर वासंतीचा नाइलाजच झाला व किशोरीची कळी खुलली-भाईला टॅब्लोमध्यें रामाचं काम मिळाल्यावर तिला भरताचं काम करावं असं फार वाटलं. पण तिला पुरुषी चालणं वागणं जमलं नाहीं. मैना मराठेला तें काम मिळालं व किशोरीला पडद्याआड भरतभेटीचं गाणं म्हणावं लागलं.

तरी पण भाईला रामाचा वेष सजवणं केवढं सुखाचं होतं ! धोतराचा कांचा मारलेला, खडावा, धनुष्य, जटा ह्यांनीं नटलेला भाई कसा भावासारखा, देवासारखा, दृष्ट लागण्यासारखा दिसत होता. नाटकांत तर किशोरीनेंच भाईच्या वेषभूषेची निवड केली. सूटबूट, टायकॉलर व फेल्टहॅट ! रंगभूमीवर भाई ऐटींत खुर्चीवर बसे. खणखणीत बोले. विंगमधून डोळयांत प्राण गोळा करून किशोरी पाहात राहिली. पुरुषी कपडे घातलेला भाई आतां खराखुरा भाऊ वाटत होता ! हातांतली काठी फिरवीत नाटकांतलीं वाक्यें म्हणे, "माझी बहीण म्हणजे वाटेवरची गाय नाहीं. तिन्ही लोकांत सांपडणार नाहीं, अशी अलौकिक..."

संमेलन संपल्यावर सहामाही परीक्षा आली व परीक्षा ओटोपतांच दिवाळीची सुट्टी आली. आपापल्या गांवीं जायची वसतिगृहांतल्या मुलींची एकच धांदल उडाली होती. आईवडिलांना, भावाबहिणींना भेटायला जी ती अधीर झाली होती.

" भाई, तूं माझ्या घरीं चलना !–काय हरकत आहे ?–" भाईच्या बांधलेल्या होल्डऑलवर बसून किशोरी रडव्या स्वरांत म्हणाली. भाईला सोडून जायचं म्हणजे माहेर सोडून जाणाऱ्या सासुरवाशिणीसारखं दुःख होतं ! हा विरह नको म्हणून ती भाईला अनेक वेडेवाकडे पर्याय सुचवीत होती.

"किशोरी, वेडी का तूं ? अग, सारी तीन आठवड्यांची सुट्टी. मग आहोंतच कीं आपण पुन्हां. अन् एकादिवसाआड पत्र पाठवायचं ठरलंय् ना आपलं —"

"हो – पण –" होल्डऑलच्या पट्ट्याशीं खेळत किशोरी म्हणाली अन् अश्रु टिपूं लागली.

"वेडी पोर — किती लोभ लावतेस !-- मी तुझी खरीखुरीच भाऊ असतें तर--"

"असं नको बोलूं. असं नको बोलूं--" किशोरी तिचं मनगट आपल्या डोळ्यांवर ठेवीत म्हणाली. तिला अश्रु आवरेनात. भाई गाडींतून गेला. मग तीहि दुसऱ्या गाडीनें आपल्या गांवीं गेली. पण अश्रु संपेनात. घरीं गेल्यावर आईच्या कुशींतच अखेर तिचं मन निवलं...

किशोरी घरीं दोनएक दिवस रमून गेली. आई, बाबा, टिप्या कुत्रा, गुलाबाचीं कलमं, नव्या रेकॉर्डस्, जुन्या मैत्रिणी. पण दोन दिवसांतच सारं कोमेजलं. कंटाळवाणं झालं. पलंगावर पडल्यावर, न्हातांजेवतांना व कुणाशीं बोलतांना भाईची आठवण अधिकच येऊं लागली. खारींचं पोर पकडणारी, सुवर्णाबद्दल सूचना देणारी, मावशीबाईंना सांगून तूप जास्त वाढायला लावणारी, रंगभूमीवर रामचंद्राचं काम करणारी — भाईचीं अनेक रूपं तिला दिसत राहिलीं. ती एकटी असली कीं हळूच 'भाई!' म्हणून हांक मारी! स्वप्नांत तिला एक दणगट मनगट दिसे. कुणा पुरुषाचा स्पर्श तिच्या खांद्यावर होई!

तशांतच तिच्या पत्राचं भाईनें वेळेवर उत्तर धाडलें नाहीं नि किशोरी अधिकच अस्वस्थ झाली. किती छान, मोठ्ठं पत्र घातलं होतं तिनं भाऊरायाला! सगळं लिहिलं होतं. घरांतलं, मनांतलं. पण पठ्ठ्यानें दोन ओळींचं उत्तरहि धाडलं नाहीं तिला! रोज हरणासारख्या उड्या मारीत ती पोस्टमनाच्या पुढ्यांत जायची व चिमणीएवढं तोंड करून परत फिरायची. किती विरस व्हायचा! विषाद वाटायचा! दिवाळीच्या न्हाण्यांत, खाण्यांत तिला गंमत वाटेना. दिवस जात, पण पत्र नसे. किशोरी अधिकच दुःखी होई. घराशेजारच्या तिच्या मैत्रिणी तिला नको वाटत. अन् तिच्या एकदोन बालमित्रांची तर शिसारी येई! एकटीच ती पलंगावर वा गच्चींत उभी राही. चंद्राकडे पाहात, जुन्या स्मृतींना पाहात. आईला वाटे, पोरीला होतंय तरी काय! किशोरी स्वतःशींच पुटपुटे, 'काय कळणार तुला आई ?-- माझ्या दुःखाला हंसशील तूं! माझ्या आधीं दोन वर्षं झालेला माझा भाऊ अगदीं लहानपणीं गेला

म्हणून तूं एकदां रडत होतासि, तेव्हां मीं तुझी समजूत घातली. पण तूं मला कसं समजावशील ? अन् मी रडूं तरी कसं ?--'

दिवाळी जवळ आली अन् किशोरीची केविलवाणी अवस्था झाली. वासंती आपल्याला विसरली ह्या भावनेनें ती व्याकुळ झाली. अन्न घशाखालीं जाईना. दिवस डोईवरचा उतरेना. पुस्तकं वाचीत, कांहींबाहीं विचार करीत ती पडून राहूं लागली. पण तेवढ्यांत भाईचं भलंमोठ्ठं पार्सल आलं! एक स्वेटर भेट म्हणून आला, अन् त्याबरोबर पत्र! क्षमायाचनेचं. थट्टामस्करीचं. सुट्टींत सफरीला गेली होती ती, तेथल्या वर्णनाचं!--तो स्वेटर घालून व त्या पत्राचीं पारायणें करून किशोरीला हर्षवायु व्हायची वेळ आली! तिच्या भाईची माया, बंधुप्रेम अस्सल होतं तर! अन् ही देणगी-ही तर भाऊबीज! अय्या, अहाहा, किती सुंदर ओवाळणी तरी!...

दिवाळी संपतांच किशोरीनें घरून निघायची तयारी केली व सुट्टी संपतांच ती शाळेंत दाखल झाली. अधिक दिवस राहायचा वाडिलांचा आग्रह तिनें अभ्यासाच्या सबबींवर उडवून लावला व आईकडून हट्टानें खूपसं फराळाचं बरोबर घेतलं. सारं भाईसाठीं! भाई भेटला कीं...

पण भाई होस्टेलमध्यें आलाच नाहीं. शाळेंत भेटला व म्हणाला,

" किशोरी, मीं होस्टेल सोडलं. माझ्या वडिलांची इथें बदली झाली. कालच आम्ही सारे आलों. गांवाबाहेर जागाहि मिळाली—"

किशोरीवर जणूं वज्राघात झाला! सुन्न होऊन ती म्हणाली, " तूं होस्टेल सोडलंस? माझ्यापासून दूर झालीस? मग आपण—"

"आपण काय वेडे?—आपण भेटणारच कीं रोज! मी शाळेंत नाहीं का येणार रोजची? फक्त सकाळ-संध्याकाळ नाहीं."

भाई भेटल्याचा आनंद व तो दुरावल्याचं दुःख ह्यांचं विचित्र मिश्रण किशोरीला व्याकुळ करीत होतं! तिला काय करावं कळेना. तेवढ्यांत भाईच म्हणाला,

" असं काय करतेस?—चल, काय काय सांगणार होतासि तें सांग पाहूं मला. अन् किती वाळली आहेस ग! केवढी मोठी दिसूं लागली आहेस एखाद्या विदुषीसारखी--"

—आतां मधल्या सुट्टींत अन् शाळा सुटल्यावर थोडा वेळ कुंजाशीं बसून गप्पा

मारणं एवढाच भाईचा सहवास उरला होता. किशोरीला वसतिगृहांतलं वातावरण विषवत् वाटूं लागलं. भाईशिवाय सारं ओकंओकं झालं. तिचे सारे वेध मधल्या सुटीच्या वेळेकडे लागूं लागले. तेवढ्या तासांत भाईशीं बोलायचं, त्याच्यावर माया करायची!—— दुःखांत सुख एवढंच कीं भाईलाहि तिची कुचंबणा उमगली. खेळ सोडून, मैत्रिणी सोडून ती किशोरीकडे येई. तिला हात धरून कुंजाकडे नेई. तिच्या अभ्यासांतल्या अडचणी विचारी. वसतिगृहांतल्या तक्रारी विचारी. तिच्या मनाला आधार देई. पूर्वी कधीं नाहीं इतकी आपुलकी दाखवी. अन् म्हणून किशोरीला भाईबद्दल, बंधुप्रेमाबद्दल अधिकच उमाळे येत. भाई वसतिगृहांतून गेला, ह्या विश्वांत कुठेंहि गेला, तरी तिची त्याच्यावरची निर्व्याज माया तशीच राहणार ह्यांत काय संदेह!

शनिवार आला तशी किशोरीला कसेंसेंच झालें. आतां दीड दिवस भाईची संगत नाहीं. अर्धा शनिवार व पुरा रविवार कसा काढायचा तिला कळेना. शाळा सुटतांच कडू तोंड करून ती भाईला भेटली.

भाई म्हणाला, “ उद्यां रविवार. जेवायला यायचंस तूं माझ्या घरीं. दहा वाजतां! मीं मेट्रनची परवानगी काढली आहे. माळ्याबरोबर ये. माळी येणार आहे आमच्या बंगल्यावर कलमं घेऊन. ये हं नक्की! खूप गम्मत करूं मग दिवसभर. दर रविवारींच नेणार आहें मी तुला——”

किशोरी एकेक शब्दाबरोबर बहरत गेली. सारा रविवार होस्टेलमधून दूर, आणि भाईच्या सहवासांत! अन् दर रविवारीं हें सुख! ह्यासाठीं सहा दिवसांचा भाईचा विरह सोसणं कठीण नव्हतं. किशोरीला झपूर्झा घातल्या-गत झालं.

शनिवारची रात्र अनेक सुमधुर स्वप्नांनीं विणली गेली व रविवारची सारी सकाळ आरशापुढें अनेक दृश्यें पाहण्यांत संपली. नटून थटून किशोरी निघाली. आपल्या भाईला भेटायला अमाप आतुरतेनें निघाली.

गांवाबाहेरच्या एका बंगल्यांतल्या दळवींच्या बिन्हाडाशीं ती माळ्याबरोबर आली. दार बंद होतें म्हणून तिनें जोरानें कडी वाजवली. भाई भेटणार म्हणून तिची छाती खारीच्या पोरासारखी धडधडली.

दार उघडलें. किशोरीनें पाहिलें, तों सूटबूट घातलेला कुणी तरुण मुलगा! नाटकांतली, पुरुष वेषांतली वासंती!—— तिचे डोळे चमकले व ती भाईच्या त्या

वेषाकडे पाहायचा यत्न करूं लागली. हा भाई? सुटाबुटांतला, मोठ्या डोळयांचा, दणगट मनगटांचा, हिरव्या हनुवटीचा! हा--

तेवढ्यांत मागून आवाज आला, "ये ना ग किशोरी—" किशोरीनें पाहिलें तों पदर खोचीत भाई दाराकडे धांवत येत होती. मग हा पुरुष कोण?– पुरुष?–

तेवढ्यांत भाई पुढें होऊन म्हणाली, " ये!--पण थांब, तुझी ओळख देतें करून. हा वामन–माझा भाऊ--"

किशोरी कशीबशी पुटपुटली, " तुझा भाऊ... !"

× × ×

वासंती दळवी झपझप शाळेशीं आली. भर दुपारचं दुरून यावं लागल्यानें तिच्यासारखी सशक्त मुलगी सुद्धां दमून गेली होती. तिच्या रुंद कपाळावर उन्हाळा नसूनहि धर्मबिंदु उमटले होते. बांधलेला पदर मोकळा करीत तिनें घाम टिपला व ती प्रवेशद्वाराशीं आली. रविवारची सुट्टी असल्यानें दार लोटलेलें होतें. तिनें रखवालदाराला हांक मारून तें उघडून घेतलें. रखवालदार तिला खारीचं पोर पकडून देणार होता, त्यासंबंधीं बोलावं असं तिला वाटलं. पण त्याला ओलांडून ती तशीच आंत, बागेंत गेली. वसतिगृहांत टेबलटेनिसचे सामने रंगांत आले होते. मुलींच्या टाळयांचे व हशांचे आवाज लाटेसारखे तिच्याकडे आले व खेळ पाहायला जायला ती अधीरी झाली. पण ती खार पाहायला, खेळ पाहायला आलेली नव्हती. किशोरीची चौकशी करायला व्याकुळ होऊन आली होती.

आदल्या रविवारप्रमाणें आजहि तिनें किशोरीला जेवायचें निमंत्रण दिलें होतें. पण किशोरी आली नव्हती! बारा वाजेपर्यंत सर्वांनीं ताटकळत तिची वाट पाहिली. वासंतीचा विरस झाला. किशोरी कां आली नाहीं, कळेना तिला! मग तिच्या ध्यानांत आलं कीं काल ती जेवायला यायचं कबूल करण्यास टाळाटाळच करीत होती. इतकंच नाहीं, तर गेला सारा आठवडा ती वासंतीशीं, तिच्या भाईशीं, मोकळेपणानें बोलत नव्हती. पूर्वीसारखी सुट्टींत तिला गांठत नव्हती. 'भाई!' म्हणून हांक मारीत नव्हती. उलट वासंतीची दृष्टादृष्ट झाली कीं तिचा चेहरा विचित्र होत असे. वासंतीला हळूहळू सारी जाणीव होत गेली. तिला सुचेनासं झालं. दुपारचा चहा होतांच ती उठली व शाळेकडे धांवली.

वसतिगृहांतल्या खेळाच्या हॉलकडे दुरून नजर टाकून वासंती उजव्या दिशेच्या कुंजाकडे निघाली. किशोरी एकटीच कुंजाशीं बसली असेल अशी तिची खात्री होती. तिच्या ताईला ती पुरी ओळखीत होती. कुंजांत बसून ती आपल्या धाकट्या ताईची समजूत घालणार होती. तिला परत फुलवणार होती. भाई म्हणून हांक मारायला लावणार होती.

वासंती कुंजाशीं गेली आणि कल्पनेप्रमाणें किशोरी तिथें चौथऱ्यावर एकटी बसलेली पाहून तिला मनस्वी आनंद झाला. गोड दिसत होती ती. पण किती दुःखी, एकाकी ! तिचं म्लान अधोवदन पाहून वासंतीचं मन कारुण्यानें, कळवळ्यानें भरून गेलें. ती हळूच म्हणाली, "ताई, ए किशोरी —" अन आवेगानें तिच्या पुढ्यांत गेली.

वासंतीला पाहतांच किशोरी कमालीची दचकली. उठूं लागली. पण वासंतीनें तिला उठूं दिलें नाहीं. उलट तीच किशोरीजवळ बसली व म्हणाली, "हें ग काय, आली नाहींस जेवायला ! किती वाट पाहिली आम्हीं —"

किशोरीची मुद्रा अधिकच करुण झाली. तिनें तोंड फिरवलें. वासंतीला कसंसंच वाटलं. किशोरीची हनुवटी धरून तिनें तिला आपल्याकडे पाहायला लावलं. मग टक लावून म्हटलं,

"रागावलीस किशोरी ? —"

त्यासरशीं किशोरीच्या डोळ्यांतून पाणी ओघळलं. तिनें डोळे मिटले व मान हालवली.

वासंती पुन्हां म्हणाली, "रागावलीस ना माझ्यावर ? – सांग ना – काय केलं मीं ?"

त्यासरशीं किशोरीनं तिचं मनगट धरलं व म्हटलं, "नाहीं ग, तूं कांहीं केलं नाहींस. मी तुझ्यावर नाहीं रागावलें —"

"मग असं कां करतेस ? — कां रडतेस ? — कां टाळतेस मला ? – जेवायला आली नाहींस. गेल्या आठवड्यांत धड चार शब्दहि बोलली नाहींस. मागल्या रविवारीं जेवायला आलीस तेव्हांपासून अशी बिथरलीस ! कां ? — सांग मला. मी तुझा भाई ना ? —"

किशोरीनें डोळे टिपले. दृष्टि दूरवर नेली. मग ती शांतपणें वासंतीकडे पाहात म्हणाली, "कसं सांगूं वासंती ! — तुझ्याबद्दलची माझी माया एकाएकीं आटली

ग ! तूं माझा भाऊ असल्याची माझी भावनाच संपली ! मी मागल्या रविवारीं तुझ्या घरीं आलें नि तुझा भाऊ माझ्या दृष्टीस पडला. अन् त्या क्षणापासून तुझ्याभोंवतीं मीं कल्पनांचें, भावनांचें जें जाळें विणलें होतें तें तुटून गेलें —”

वासंती घाईनें म्हणाली, “ असं कसं ?— तुझं माझं गुपित कसं सरेल ? फार तर माझ्या भावाला मान तुझा भाऊ. पण तुला—”

“ नाहीं–नाहीं. त्याच्याबद्दल माझ्या मनांत तशी भावना स्फुरतच नाहीं. तो – तो माझा भाऊ कसा ? – मला कांहीं समजत नाहीं ग– एवढंच कळतं कीं तो मला प्रत्यक्षांत दिसला अन् तुझं माझं कल्पनेंतलं नातं सरलं —”



■ ८ ■

# सरहद्द

VISIT KASHMIR

कल्याण स्टेशनवरच्या एका खांबावर लटकवलेल्या काश्मीरच्या चित्राकडे बद्रीप्रसाद चड्डा बधीर डोळयांनीं पाहात होता. चित्राखालचे ते दोन इंग्रजी शब्द त्याला जेमतेम वाचतां आले. आणि ते शब्द समजले म्हणून तरी तें चित्र काश्मीरमधील निसर्गाचं आहे, असं तो मानूं शकला. नाहींतर त्याला तो देखावा दाक्षिणेकडच्या कुठल्याहि ठिकाणचा वाटला असता! आपली लटलटणारी मान सांवरीत तो तसाच भकासपणें बघत राहिला. त्याच्या डोळयांपुढून काश्मीरचीं अनेक अस्सल अन् रंगबिरंगी दृश्यें चमकून गेलीं. बागेंतलीं, बोटींतलीं, बर्फांतलीं. रावळपिंडीपासचं आपलं गांव सोडून तो पत्नीसह, पोराबाळांसह कित्येकदां काश्मीरच्या कानाकोंपऱ्यांत, दऱ्याखोऱ्यांत हिंडला होता. आपल्या नातवंडांनाहि एकदां त्या स्वर्गीय स्थळीं न्यायचा त्याचा मनोदय होता. पण आतां सारंच अशक्य होतं. स्वर्ग कुठला, त्याला त्याच्या जन्मभूमीवरून हुसकला होता व नरकांत ढकलून दिला होता. त्या भिकार फलकाकडे पाहतांना त्याला वाटलं, ' काश्मीर पाहा ' ही जाहिरात कशाला लावली आहे इथं ?– काश्मीर पाहणारे, काश्मीरनजिक राहणारे लोक तर तिथून दूर, दक्षिणेकडे धांव घेत आहेत. ' कन्याकुमारी पाहा—' अशीच जाहिरात इथं अधिक शोभून दिसेल!

कुणाचा तरी धक्का लागला व बद्रीप्रसाद बाजूला झाला. आपलं गांठोडं घट्ट कवटाळून उभा राहिला. एकेकाळीं उंच व धिप्पाड असलेला त्याचा देह वांकला होता. त्यावरची लाली पुसली गेली होती व कातडी सुरकुतली होती. चड्डा घराण्याला पिढीजात लाभलेला धिप्पाडपणा त्याच्या वांट्याला आला होता खरा, पण जगाच्या पाठीवर फार थोड्यांना सहन करावे लागतील असे भोग त्या

पंजाबी पुरुषाला भोगावे लागले होते. आयुष्याच्या उतरणीवर आल्यावर त्या शीलवान्, धनवान्, कर्तृत्ववान् गृहस्थाची बेअब्रू झाली होती. धाकटा मुलगा डोळ्यांदेखत मारला गेला होता व त्याच्या पत्नीवर सर्वांदेखत सामुदायिक बलात्कार झाला होता. एकुलत्या एक लाडक्या कन्येला घरांतल्याच नोकरांनीं पळविलं होतं. रावळपिंडीजवळची फळबाग, मोठा वाडा, दुभतीं जनावरं व टांगा जाळून टाकला गेला होता. शहरांतल्या बँकेंत ठेवलेली रोकड व दागिने लुटले गेले होते. पिढ्यान्पिढ्या चालत आलेलं व स्वतःच्या घामानें फुललेलं सारं वैभव पाकिस्तानी प्रलयांत खाक झालं होतं. साडेतीन हातांचा काष्ठवत्, विष्ठेवत् देह तेवढा उरला होता — आणि हें गांठोडं ! दहा बारा कपड्यांचं. एक दोन दुलयांचं.— तेंच उराशीं धरून तो उभा होता.

नाहीं; केवळ गांठोडं नाहीं, केवळ गांठोड्यासारखा देह नाहीं, तर आणिक कांहीं धागे उरले होते. म्हणूनच हा घोळ पडला होता. म्हणूनच बद्रीप्रसाद तेव्हां पिंडीहून हिंदुस्थानांत आला. म्हणूनच आतां हिंदुस्थानांतून दक्षिणेंत चालला होता.

बद्रीप्रसादला पिंडी सोडायची नव्हती. आपला मुलूख, आपली जन्मभू सोडायची नव्हती. त्या भयंकर संहारांतहि तिथेंच राहायचं होतं; व राख-रांगोळी झाल्यावर तेथल्या जमिनींत मिसळून जायचं होतं. आपला गांव सोडून जगाच्या पाठीवर कुठंतरी घर करून राहायची कल्पनाच त्याला अत्याचारी, आत्मघातकी वाटत होती. गांवांतलीं हिंदूंचीं सारीं घरं जळालीं लुटलीं गेलीं तेव्हां शेजारच्या सूद साहेबांच्या लोकांबरोबर घरांतली मंडळी पाठवून बद्रीप्रसाद गांवांतच घुटमळत राहिला. सर्व स्थिरस्थावर झाल्यावर पुन्हां मळा पिकवूं व घर उभारूं असे बेत करीत ! पण कुणींतरी बातमी कळवली कीं, वाटेंत सूद साहेबांचे सर्व लोक मारले गेले, धाकटा रामनारायण चड्डा मारला गेला, बेटी माधुरी पळवली गेली व रामची पत्नी, बद्री चड्डाची धाकटी सून... बद्रीप्रसाद आकांत करीत उठला. फुटल्या उरानं पिंडीस पळत आला. पण मग त्यालाच दंगेखोरानं झोडपलं. स्टेशनावरून हिंदुस्थानांत पळायला लावलं. आपलं हृदय पांच नद्यांच्या प्रवाहांत घुटमळत ठेवून त्याला परदेशीं व्हावं लागलं. पिंडीच्या स्टेशनावर असंच कसलंसं बोचकं छातीशीं धरून उभं रहावं लागलं.

गांठोडं खालीं ठेवून बद्रीप्रसाद त्यावर बसला व खोकूं लागला. प्रवास करून तो दमून गेला होता. पुण्याकडची गाडी केव्हां येणार हें त्याला कळत-नव्हतं. कुणाकडे फारशी चौकशी करायची सोय नव्हती. आजूबाजूचे रानवट, खुजे लोक तिरसटासारखं पाहात, हेंगाडी भाषेंत कांहींतरी पुटपुटत! कल्याण स्टेशनवरचे ते उतारू, ती गर्दी, गोंधळ पाहून बद्रीप्रसादला उदास उदास वाटलं. कुठल्या परक्या नि भिकार जागीं तो आला होता. कसलीं हीं गांवं नि कसलीं हीं स्टेशनं! त्याला रावळपिंडी स्टेशनवरचं दृश्य आठवलं. तिथें तो नागवलेल्या निर्वासितांच्या व पाकिस्तानी लांडग्यांच्या घोळक्यांत असाच एकाकी, भकास मनानं उभा होता. इथल्या ह्या लोकांतहि त्याला तीच भावना ग्रासत होती. हिंदुस्थानांत पाऊल टाकलं कीं, आपला थोरला मुलगा, थोरली सून, नातवंडं, पुतणे, उरलेला सारा परिवार भेटेल, ही आशा पिंडीच्या फलाटावर होती. तोच पाश आजहि होता म्हणूनच तो आतां पुण्याच्या दिशेकडे चालला होता.

बद्रीप्रसादला आपल्या नातवंडांची, मुलाची तीव्रतेनं आठवण आली व तो उल्हासानं जागच्या जागीं चाळवाचाळव करीत गाडीची वाट पाहूं लागला. घरांतली देवी त्यानं लपवून, जपून आणली होती. ती तो सुनेला पूजेसाठीं देणार होता. अन् बाल-गोपाळांसाठीं दिल्ली स्टेशनवर घेतलेली अधेलीची मिठाई. छोटी मुन्नी त्यानें गेल्या तीन वर्षांत पाहिली नव्हती. पण ती कशी दिसत असेल, ह्याची अडचण त्याला पडली नाहीं. चड्डा आडनांवाच्या पोरी नि पोरं कुठल्या वयांत कशीं दिसतात, हें त्याला पूर्ण माहीत होतं. घराणंच तसं खानदान, शुद्ध रक्ताचं. मुन्नीला छोटा भाऊहि झाला होता. तो त्यानं पाहिलाहि नव्हता. पण तो आतां त्याच्या खांद्यावर छातीशीं होता जणूं! केवळ ह्या साऱ्या पसाऱ्यासाठीं बद्रीप्रसाद दक्षिणेकडे वाटचाल करीत होता.

'ए बुड्ढा-तिकीट है तेरे पास?-' त्याच्यापुढं तिकीटचेकर एकाएकीं उभा राहिला व मगरूरपणें म्हणाला. त्याचा उर्मट आवाज, उर्मट भाषा पाहून बद्रीप्रसाद चिडून गेला, जीर्ण शेरवाणी धुंडाळूं लागला. त्याचा संभ्रम पाहून चेकर अधिकच घाई करूं लागला. आजूबाजूचे बघ्ये लोकहि तेवढ्यांत गोळा झाले.

'फुकट भटकायला हवं!-निर्वासित-' चेकर ओरडला. पण त्याला चूप व्हावं लागलं. इतरांचीहि निराशा झाली. कांपऱ्या हातानं बद्रीप्रसादनं तिकीट

पुढं केलं. आंठ्या घालीत चेकरनं तें तपासलं. ‘ शिवाजीनगर-मग बस ना त्या गाडींत-’ तो ओरडला. इतर लोक हंसले व पांगूं लागले.

पलीकडे गाडी खडी आहे, हें बद्रीप्रसादला आतां उमगलं. तो उठला व बोचकं घेऊन धांवूं लागला. ‘ सामान तपासा त्याचं–’ कुणीतरी तेवढयांत म्हणालं. तें मराठी वाक्य त्याला कळलंहि नाहीं. गाडीपाशीं जाऊन दारांतून बरीच हुज्जत घातल्यावर तो एके ठिकाणीं थांबला. कसाबसा आंत घुसला व संडासापाशींच उभा राहिला. मळकं बोचकं त्यानं छातीशीं आंवळून धरलं व तिकीट नीट ठेवलं आहे, कीं नाहीं हें पाहिलं.

‘ बिगर तिकीट ! हूंऽ–लाखाचा आसामी होतों मी. माहिती नाहीं ह्या पोटभरू लोकांना. अन् आज कफल्लक असलों तरी माझा मुलगा कँटीन काढून आहे सध्यां. काय वाटलं ह्यांना ? ’ बद्रीप्रसाद पुटपुटत होता व डब्यांतल्या उतारूंकडे तिरस्कारानं पाहात होता. कितीतरी लोक दाटीवाटीनं मेंढरासारखे बसले होते. मेंढरासारखेच मवाळ वाटत होते. कुणाच्यांत उमदेपणा, अस्सल-पणा दिसत नव्हता. त्यांच्या ओंगळ हालचाली व हेंगाडी भाषा तर फारच भयंकर होती. बद्रीप्रसादाच्या डोळ्यांत भीतीची भावना भरूं लागली. ह्या लोकांच्यांत मिसळायचं, रहायचं ह्या कल्पनेनं त्याला कसंसंच वाटलं. त्याचे अधू डोळे उघडझांप करूं लागले. ओंठ हालूं लागले, ‘ आलों नसतों, आलों नसतों ह्या नरकांत. पण काय करूं ! ’–

फलाटावरून एक सिंधी चेकर घाईघाईनं गेला. त्याला त्या मघाचच्या चेकरला दम द्यायला सांगावं, असं बद्रीप्रसादला वाटलं. पण त्याला सिंधी निर्वासितांचा भरवंसा नव्हता. समोरच सामानाच्या राशीशीं तीनचार शीख शिपाई खडे होते. त्यांच्या दाढ्या व बंदुका बद्रीप्रसाद टक लावून पाहात राहिला. त्याला वाटलं, ह्या सैनिकांना ओरडून सांगावं, कीं मला परत पोंचवा. दिल्लीला पोंचवा, अमृतसरला पोंचवा. एखाद्या छावणींत टाका. सरहद्दीवर कुठेंतरी सोडा. पण मला दूर दक्षिणेकडे जाऊन देऊं नका. मला थांबवा !––

पण गाडी हालली, फलाट मागं पडला, शीख शिपाई अदृश्य झाले व उत्तर हिंदुस्थानचं एक टोंक धरून असलेलं कल्याण स्टेशन कायमचं मागें

पडलं. मजल दरमजल करीत चाललेला बुड्ढा बद्रीप्रसाद अखेरच्या मुक्कामाला, मुलाबाळांत मिसळायला निघाला...

'आलों नसतों, आलों नसतों ह्या नरकांत–' त्याचं घायाळ मन गाडीच्या तालावर आक्रंदत राहिलं. पंजाबांतून तुडवला गेला, फेंकला गेला म्हणून तो हिंदच्या हद्दींत आला. निर्वासितांच्या छावणींत आपल्या उरल्यासुरल्या माणसांत आला. सुरुवातीचा हलकल्लोळ, गोंधळ संपतांच हळूहळू सारे पांगूं लागले. गंगेच्या काठांनीं, राजस्थानच्या वाळवंटांतून पसरूं लागले. मग एक दिवस थोरला लेक म्हणाला कीं, आपल्यालाहि कुठं काम पाहिलं पाहिजे. घर उभं केलं पाहिजे. अमृतसरला, दिल्लीला, लखनौला, कानपूरला, कलकत्त्याला. वेळ पडल्यास आणिक कुठं दूर!

लेकाच्या सूचनेचा बद्रीप्रसादानें धिक्कार केला. त्याचं सारं चित्त नव्या सरहद्दीपलीकडं वणवण हिंडत होतं. पिंडींत पडलेलं पोराचं प्रेत धुंडाळीत होतं. पेशावरपर्यंत हिंडून माधुरीचा शोध घेत होतं. आपल्या घराचे जळके वासे खांद्यावर घेऊं पाहात होतं. छावणींत तो खात–पीत होता, जगत होता, पण मनानं पाकिस्तानांत भटकत होता.

थोरल्या मुलानं अनेकवार सांगून पाहिलं. पटवून द्यायचा प्रयत्न केला. सध्यांची हलाखी सांगितली. पण भ्रमिष्ट बद्रीप्रसादचं कुठं लक्षच नव्हतं. मुलगा काय करतो, सून काय नेसते, चिल्लींपिल्लीं काय करतात, त्याला कांहीं कळतच नव्हतं. फक्त एकच जाणत होता तो!––आपल्या देशाला, आपल्या गांवाला जायचं!– गतजीवन मिळवायचं!

अखेर कंटाळून मोठा मुलगा बद्रीप्रसादची तेथेंच तात्पुरती सोय करून निघाला. पुण्यापाशीं कोठें हॉटेल काढायचा त्याचा नि त्याच्या मित्रांचा बेत होता. घरांतल्या कर्त्या, श्रेष्ठ पुरुषाला नाइलाजानं मागं ठेवून सारं कुटुंब अखेर दक्षिणेची वाट चालूं लागलं.

बद्रीप्रसादला ह्याचं विशेष कांहीं वाटलं नाहीं. अनेक पंजाबी जो पागलपणा करीत होते तोच त्याच्या पुत्रानें केला. पण तो मात्र तेथेंच, सरहद्दीशीं थांबणार होता. संधीची वाट पाहणार होता. लवकरच सारं स्थिरस्थावर होईल, मुसलमानांचीं माथीं ताळ्यावर येतील. मग आपल्याला गांवीं परततां

येईल. आपण परत घर उभारूं, बाग डोलवूं, पोरांना तोंवर दक्षिण देशची सफर साधतां येईल. मग परत सारे मजेंत राहूं !

आज तीनचार वर्षं बद्रीप्रसाद सरहद्दीवर घुटमळत होता. वाट पाहात होता. सारं पूर्ववत् व्हायचं अन् आपण मात्र दूर असायचं, असं व्हायला नको म्हणून तो देशाच्या सीमेवर ताटकळून होता. आणि दुसरीकडे जायचं कशाला अन् करायचं काय हें त्याला उमगत नव्हतं. दुसऱ्या जागीं अन्न गोड लागेल व दिवस घालवतां येतील ह्यावर त्याचा विश्वास नव्हता. नाइलाजानं तो पाकिस्तानच्या अलिकडे अडकून पडला होता. आपल्या मातृभूमीवर पाऊल ठेवायला तळमळत होता.

पण दिवस गेले व वर्षेंहि संपूं लागलीं. संहार संपत चालला पण परत जाण्याची संधि येईना. परतायची कुणी भाषाहि बोलेना. बद्रीप्रसाद पिसाळून गेला. वेळ जात होता, वार्धक्य वाढत होतं. नव्यानें जडलेला रक्तदाबाचा विकार आटोक्याबाहेर जात होता. अखेर कंटाळून त्यानें पंजाबकडे पाठ फिरविली. आपल्या पोराबाळांची आठवण केली. महाराष्ट्रांत एका गांवीं हॉटेल उघडून बसलेल्या लेकानें पैसे धाडतांच तो निघाला. निरीच्छेनं, नाइलाजानं ! नरकयातना सोशीत !--

‘ आलों नसतों, आलों नसतों ह्या नरकांत—’बद्रीप्रसादचं मन पुन्हां पुन्हां विव्हळत होतं. गाडी सह्याद्रीच्या घाटाकडे धांव घेत होती. शरीराशीं तडजोड न करतां बद्रीप्रसादचं हृदय जुन्या आठवणींनीं, जुन्या जखमांनीं – दमून जात होतं. आपल्या मातृभूमीला परतण्याची कांहींच आशा उरली नाहीं व आयुष्यहि संपत चालल्याचीं चिन्हं दिसूं लागलीं म्हणून तो भग्न मनानं व भग्न शरीरानं चालला होता.

पोराबाळांची याद आली व तरतरी आणण्याचा बद्रीप्रसादनें यत्न केला. त्याच एका औषधावर तो आतां जगून होता. जागच्याजागीं त्यानें चाळवाचाळव केली. जवळच्या मद्रासी माणसाच्या अंगावर रेलण्याचा प्रयत्न केला. उन्हं उतरतील व गाडी शिवाजीनगरला जाईल. रात्र पडण्यापूर्वीं आपण आपल्या लोकांत पोंचूं देखील. सर्वांना जवळ घेऊन पहाट होईपर्यंत बोलत बसूं !—

बद्रीप्रसादला उत्सुकता वाटण्याऐवजीं धास्ती वाटूं लागली. मुलांशीं काय बोलावं, त्यांना तोंड कसं दाखवायचं, कळेना. आपल्या गांवीं परत नेण्याचं

आश्वासन अनेकवार त्यांना दिलेलं होतं. ते सारेजण वाट बघत असतील. आपण भंगलेल्या मनानं परतलेलों पाहिल्यावर त्यांना काय वाटेल ? परत जाणं कधींहि शक्य नाहीं. इथंच कुठं कायमचं रहावं लागेल, हें उमगल्यावर त्यांची काय स्थिति होईल ? सारींजण आपल्या वाटेकडे डोळे लावून असतील, आपण कांहीं चांगली बातमी आणूं म्हणून उत्सुक असतील. आपण सांगूं, कीं विसरा पंजाब नि विसरा पिंडी. धनदौलत कायमची गेली. रामनारायण नि माधुरीहि बेपत्ता झाली. सारं पूर्वीचं, पूर्वजांचं विसरा—! अन् ते हताश होऊन आक्रोश करतील !—– बद्रीप्रसादला मुलाबाळांचे चेहरे आधींच दिसूं लागले अन् त्याचा चेहरा गोरामोरा झाला. मान लटलटूं लागली व हात-पायांना कांपरं भरलं. तो तसाच मटकन् खालीं बसला.

एक बुड्ढा पंजाबी निर्वासित आपल्या अंगावर रेलत अखेर खालीं बसतो, दुसऱ्याचं सामान तुडवतो ह्याचा शेजारच्या मद्रासी व मराठी उतारूंना फार राग आला. ते त्याच्याकडे तिरस्कारानं पाहूं लागले. मद्रासी माणूस इंग्रजींत कांहींतरी म्हणाला व मग मराठी इसम 'उठो ए—–' असं बद्रीप्रसादला सांगूं लागला. पण बद्रीप्रसादला उठण्याचं त्राण उरलं नव्हतं. त्यानें शून्यपणें दोघांकडे पाहिलं व डोळे मिटून तो तसाच बसून राहिला.

उद्यां तो संडासापासून उठून हक्कानं ह्या बाकावर बसूं शकेल. पण ह्या लोकांत बसण्यापेक्षां हा संडास परवडला असं त्याला वाटलं. ते दक्षिणी लोक, त्यांचे चेहरे, रंग, दृष्टि त्याला पाहवेना. कसली भाषा ते बोलत होते, वाचीत होते. त्या बायका, त्यांचं नेसूं, त्यांचं वागणं त्याला विचित्र वाटलं. ते फराळाचे जिन्नस तर अगदीं भिकार दिसत होते. अन् तें पिणारं पोर इतकं क्षयी नि रडकं दिसत होतं ! हरे राम ! ह्या लोकांत कसं बसायचं, कायमचं मिसळायचं ? बद्रीप्रसादनं तोंड फिरवलं व डोळे मिटले.

बद्रीप्रसाद आतां भकासपणें बाहेर पाहूं लागला. बाहेरचा निसर्ग आंतल्या लोकांइतकाच त्याला क्षुद्र वाटत होता. कसले ते डोंगर नि भोंवतालचीं झाडं ! ही काय सृष्टिशोभा म्हणायची ? बाजरी नि जोंधळा जिकडेतिकडे. जनावरांनीं खायचीं धान्यं सारीं. हेंच माणसांनीं खायचं ? भाजीचे वाफे तर अगदींच भिकार होते. ह्या लोकांनीं गव्हाचीं सोनेरी शेतं, बटाट्याचीं, कोबीचीं, सरसूचीं शेतं कधीं बापजन्मीं तरी पाहिलीं असतील काय ? रावळपिंडीची

अगर माँटगोमेरीची एक छोटी फळबाग अगर एक एकर गव्हाचा तुकडा हा सारा प्रदेश विकत घेऊं शकेल. असले पदार्थ पिकवून कसे जगतात हे लोक! म्हणूनच हे असे दिसतात. म्हणूनच त्यांचीं हीं भिकार गांवं, पडक्या झोपड्या, मरतुकडीं जनावरं. स्टेशनांचीं नांवं तरी काय एकेक. लोनावला, तलेगांव, मलवली...कसल्या महारोगी, मराठी मुलुखांत त्याला यावं लागलं होतं. कायमचं रहावं लागणार होतं. इथून तो कधींच परतूं शकणार नाहीं? इथंच तो मरणार? त्याची रक्षा इथल्या नाल्यांत टाकली जाणार? अन् त्याचं घराणं इथंच कुठं कँटीनच्या आश्रयानं वाढणार?—

अंधार पडला. आकाश झांकाळलं व क्षीण दिवे जागजागीं दिसूं लागले. शिवाजीनगर जवळ येणार म्हणून जरा उत्सुक, जरा उदास झालेला बद्रीप्रसाद शून्य मुद्रेनं बसला होता. थोरल्या लेकाला कुठल्या तोंडानीं सांगायचं, कीं इथंच कल्पान्तापर्यंत रहावं लागणार! सुनेला कसं समजवायचं, कीं बाई ग, विसर तुझं माँटगोमेरीचं माहेर. हेंच तुझं सासर नि माहेर आतां! इतर सर्वांना निराशाजनक बातम्या कशा सांगायच्या...ह्या विचारानं तो विद्ध झाला होता व आपलीं मुलंबाळं भेटतील, ह्या जाणिवेनं आतुरहि झाला होता.

'आलं—शिवाजीनगर आलं–' कुणी तरी म्हणालं व बद्रीप्रसाद चड्डा ताडकन् उभा राहिला. गाडी थांबूं लागलेली दिसतांच तो धीर करून शेजाऱ्याला म्हणाला, 'यह शिवाजीनगर?—शिवाजीनगर आहे का?' त्याच्या मराठीची त्यालाच लाज वाटली. पण शेजाऱ्यानं मान डोलावली व गाडी पुरी थांबण्यापूर्वीच बद्रीप्रसाद उतरण्याची घाई करूं लागला.

'जगत,—ओ, जगतराम चड्डा—' फलाटावर गांठोडं घेऊन उतरलेला बद्रीप्रसाद भांबावून ओरडत होता. त्याची मान लटलटत होती. सारं शरीरच थरथरत होतं. जगत् दिसेना म्हणून तो व्याकूळ झाला होता. तेवढ्यांत डब्याडब्याशीं डोकावणारे पांचसहा पंजाबी त्याला दिसले. पोषाख तेच, तसेच. बद्रीप्रसाद खुलला. जगतहि त्यांत होता! तसाच पैजामा, सदरा, जाकीट. पण, पण त्याची मुद्रा...'जगत–' बद्रीप्रसादनं साद दिली, जगत जवळ येतांच आवेगानं आलिंगन दिलं.

मग दहा पंधरा मिनिटं जगत्चे व त्यांसह आलेल्या पुतण्याचे, मित्रांचे हात दाबण्यांत, कुशल विचारण्यांत गेलीं. शेवटीं जगतरामनं गांठोडं घेतलं,

सारे स्टेशनबाहेर निघाले. बिऱ्हाड दूर असल्यानं बाप-लेक टांग्यांत बसले. इतर सारे पायीं निघाले.

आपल्या लेकाकडे बद्रीप्रसाद बघत होता. जगत बदललेला वाटत होता. पूर्वीइतका नाहीं, पण छावणींतल्यापेक्षां खूपच सुधारला होता. अंगानं सुटला होता व खुषींत होता. त्याचा गोबरा चेहरा पाहून बद्रीप्रसादला विचित्र वाटलं. त्यानं स्टेशनवर मास्तरशीं व एकदोन इसमांशीं गप्पा केल्या व टांगेवाल्याशीं मराठींत बातचीत केली. वाटेंत एका सायकलस्वाराला ओरडून कांहींतरी सांगितलं. मग टांगेवाल्याला वाट सांगूं लागला. जगत बदलला होता. तीन वर्षांत इथल्या वातावरणाशीं, इथल्या लोकांशीं एकजीव झाला होता. बद्रीप्रसादला कसंसंच झालं.

' जगत — आपल्याला पंजाबला परत जातां येणार नाहीं ! – कधींहि. मीं तीन साल वाट पाहिली. पण सारं अशक्य आहे– ' तो अखेर भावनाविवश होऊन उद्गारला.

' हां, पिताजी !– मला ठाऊक आहे. पूर्वींच कळलं होतं. अन् रोजचा पेपर सांगतोच कीं — '

बद्रीप्रसादनं कडू तोंड केलं. ह्या तरुण पोराला पेपर सांगतो, नि बुड्ढ्या बद्रीला मात्र आयुष्याचा अनुभव खोटा पाडतो ! तो अंमळशानं परत उद्गारला,

'आतां इथं रहायचं आपल्याला ! कसं जमणार बेटा ?—चड्ढा घराण्यांतल्या लोकांनीं ह्या–'

' चिंता नको पिताजी, आपला जम उत्तम बसलाय्. कँटीन मोठं झकास चाललंय्. कुणाची प्राज्ञा नाहीं निर्वासित म्हणायची. रूपच्या खांद्यावर तोळाभर सोनंहि चढलं आहे –'

हाय रे करंट्या – बद्रीप्रसादचं मन हताश होऊन म्हणालं –अरे, पंजाबी इसम पृथ्वीच्या पाठीवर कुठंहि जम बसवेल. काय तूं साधलंस विशेष ? रूपचे हजारों रुपयांचे अलंकार नाहींसे झाले त्याचं काय ? सोन्यासारखी माधुरी हरवली त्याचं काय ? परीसाचा जमीन – तुकडा पाकिस्तानच्या नरकांत खितपत पडला आहे, त्याचं काय ? कुठल्या दरिद्री मुलखांत कँटीन काढतोस, व वर फुशारकी

मारतोस, कीं ह्या मुलुखांत जम बसला म्हणून. इथल्या लोकांसारखा वागतोस, मराठी भाषा वापरतोस !—

रस्त्याच्या एका तिवाठ्याशीं टांगा थांबला. जगत्नं उडी घेतली व वडिलांना हात दिला.

रूपकुंवर सामोरी आली. आरती ओवाळूं लागली. लग्नानंतरची रूप त्याला आठवली व लगेच धाकट्या सुनेच्या आठवणीनं तो उरीं घायाळ झाला. पुतणे, पुतण्या, पंजाबी पडोसी भेटत होते, मिठ्या मारीत होते. आनंदानं बडबडत होते.

कँटीन ओलांडून बद्रीप्रसाद आंतल्या अंगाला असलेल्या बिऱ्हाडांत गेला. जगतरामनं तेवढ्यांत कँटीनचें गुणगान गायलें. रेडियोचं नवं खोकं, कोका कोलाचा लाल डब्बा, मिसळ, चकली, शेव, चिवडा ह्यांच्या बरण्या ! बद्रीप्रसाद विचित्र चेहरा करीत आंत गेला. नव्या भांड्याकुंड्यांच्या, नव्या बिऱ्हाडांत बसला.

‘ मुन्नी कुठंय्–मुन्नी कुठंय् ? ’ तो म्हणाला.

‘ होती इथंच. तुमच्या वाटेकडे डोळे लावून होती इतका वेळ. हां -शेजारीं दूध आणायला गेली आहे–’ कुणींतरी म्हटलं.

मुन्नीचे मुके घ्यायला बद्रीप्रसाद आतुर झाला होता. हे मोठे, तरणे लोक त्याला नको होते. त्यांनीं बद्रीप्रसादच्या अधु हृदयावर वार केला होता. वाटलं होतं, कीं सारे सरहद्दीची, आपल्या गांवची माहिती विचारतील. इथल्या वस्तूशीं, वातावरणाशीं तडजोड न करतां परत जायचंय् ह्या कल्पनेप्रमाणें प्रवाशासारखं उपरं आयुष्य काढीत असतील ! पण कुणीं कसलीच विचारपूस केली नाहीं. सर्वांनीं दुःख, अत्याचार गिळला होता व इथल्या चाकोरींत मुर्दाडपणें भिसळून घेतलं होतं. इथं कायमचं राहायचं मान्य केलं होतं. जसं कांहीं पिढ्यान्‌पिढ्या ते इथंच होते. ह्या हॉटेलच्या खरकट्यावर जगत होते. खोपटांत रहात होते व मराठी बोलत होते.

सर्वांना टाळून बद्रीप्रसाद मागल्या परसूंत येऊन बसला. समोरचं ओसाड माळरान पाहात मूक रुदन करूं लागला. पण तेवढ्यांत मुन्नी आली. बद्रीप्रसादनं आवेगानं तिला उचलली. बेटी किती उंच झाली, वाळली, कशी काळी दिसत होती. जणूं मराठी ! आजाला तिनं ओळखलं नाहीं. पण जवळ ओढतांच

ती त्याच्या कुशींत विसावली. ‘ मला काय आणलंत ? माझं पुस्तकं पाहिलंत ? आम्ही जत्रेला गेलों होतों –’ तिची बडबड सुरू झाली.

बद्रीप्रसाद तिला कवटाळून, डोळे मिटून होता. होय, आतां तो तिच्याबरोबर जत्रेला जाणार होता. तिचीं पुस्तकं पाहणार होता. फक्त त्याला तिला काश्मीरला नेतां येणार नव्हतं. अस्सल गव्हाची भाकर भरवतां येणार नव्हती. रसरशीत सफरचंद व फेसाळ दूध देतां येणार नव्हतं. उलट उद्यांपासून तो तिच्याबरोबर पावशेर दुधाच्या रतिबासाठीं दुसऱ्याच्या दारीं जाणार होता.

त्यानीं अधीरतेनं सुनेला साद दिली. पुन्हां विचारलं, ‘ अजून नाहीं उठला मुंडा ?– ’

‘ उठला, कपडे घालून आणत्येंच––’ सून आंतून म्हणाली. आपल्या नातवाला, मुलाच्या मुलाला, छोटया चड्डाला घ्यायला तो उतावीळ झाला होता. सुनेची चाहूल लागतांच तो अधीरतेनं उठला, पण मग जपून छोकऱ्याला घेऊं लागला. दीड एक वर्षाचा बाळसेदार बच्चा घराण्याच्या साऱ्या खुणा घेऊन आला होता. ह्याच दीड वर्षाच्या, दीड वितीच्या जीवासाठीं त्याचं खंगलेलं शरीर व मरगळलेलं मन इथं धांवत आलं.

गालावर, खांद्यावर, हाताच्या झोल्यावर बद्रीप्रसादनं छोकऱ्याला झुलवलं. आतां हेंच त्याचं वैभव ! त्याला ओसरीवर रांगतां ठेवून बद्रीप्रसाद दुरून बघूं लागला––अन् पाहतां पाहतां त्याला न पाहिलेला दुसरा नातू दिसला ! पाकिस्तानांत असलेल्या, बलात्कारानं धाकटया सुनेच्या पोटीं आलेला नातू ! –बद्रीप्रसादनं छातींतली कळ दाबून धरली. सारं विसरण्यासाठीं परत पोराला उचललं.

बाहेर गेलेली मुन्नी तेवढ्यांत आली. आपल्या परकर पोलका घातलेल्या, लंगोटया लावलेल्या मित्रमैत्रिणींना वाटेला लावून व आपलं नवं पुस्तक घेऊन आली. तिचे मित्र, तिचीं पुस्तकं बद्रीप्रसाद पाहात होता. ‘ मी–मी वाचून दाखवतें–’ ती पुस्तक ओढून म्हणाली, ‘ मी शाळेंत जातें, मराठीहि येतें मला. गाणं म्हणून दाखवूं ?–गंगा जमूना डोळयांत उभ्या कां, ज्या मुली ज्या—’ ती पुस्तक टाकून गात सुटली. मांडीवरचं मूल टाळया वाजवूं लागलं. बोबड्या बोलांत ‘ ज्या–मुली ज्या–’ करूं लागलं. घरांतून चुलीचा

धूर येऊं लागला. कँटीनमधला रेडियो केकाटूं लागला. सारं जग हंसूं, डोलूं लागलं......

बद्रीप्रसाद बघत होता, ऐकत होता. तें गाणं, तीं मुलं, झोंपड्या, माळरान, क्षितिज! हें सारं पाकिस्तानांतल्या प्रलयाइतकंच भीषण वाटलं त्याला! हा प्रलय बांध घालूनहि अडला जाणार नव्हता. आतां सरहद्द आंखूनहि सत्त्व टिकणार नव्हतं. बद्रीप्रसादची मान लटलटूं लागली. वरकरणीं त्यानें हंसरा चेहरा केला, आणि कित्येक दिवसांनीं आज प्रथमच त्याचे डोळे पाण्यानें डबडबले.



. १ .

# दुसरी खेप

" मला शंका येते...मला भीति वाटते... "

कुंदाच्या कांपऱ्या स्वरांत उच्चारलेल्या शब्दांनीं सारा संसार शहारून गेला. भिंतीला छोटी फळी मारून त्यांवर ठेवलेल्या देवीपुढचं नीरांजन थरथरलं, व पटईपासून वायर जोडून टेबलावर टांगलेल्या विजेच्या दिव्यांतल्या तारा पांढऱ्या पडल्या. स्वैंपाकघरांतलीं रिकामीं भांडीं व उष्टावलेलीं ताटं आणि बाहेरच्या खोलींतलं सकाळचं वर्तमानपत्र व दांड्यांवर वाळणारे कपडे उदास दिसूं लागले. कोपऱ्यांतला पाळणा तर घुबड ओरडावं तसा किरकिरला !–

दोन खोल्यांच्या व अडीच माणसांच्या संसारांत ते शब्द उच्चारायला कुंदाला काल सकाळपासून जड वाटत होतं. तसं कांहीं बोलणंघडणं म्हणजे आयुष्याला अवकळा येण्यासारखं होतं. तसं कांहीं नसावं, न व्हावं, म्हणून कुंदा देवाची करुणा भाकीत होती. पण हळूहळू नि निश्चितपणें तें होणार हें तिला जाणवलं होतं. ती भेदरली होती, कावरीबावरी झाली होती ! अखेर रात्रींचीं जेवणं झाल्यावर उष्टीं तशींच टाकून ती धनंजयाला म्हणाली, " मला शंका येते...भीति वाटते... "

बाळ निजलेल्या पाळण्याला एक झोका देऊन धनंजय सुपारीचं खांड शोधीत होता. कुंदानें एकदम येऊन बोलणं सुरू केलेलं पाहून तो दचकला. खरकट्या हातांची व घामानें थबथबलेल्या कपाळाची कुंदा काय म्हणते आहे, हें समजेचना त्याला. एखाद्या निर्बुद्ध नरासारखा तो तिच्याकडे नुसता पाहात राहिला.

नाइलाजानें कुंदानें जरासा खुलासा केला. अन् मग धनंजयच्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला. कुंदाच्या डोळ्यांतली व्याकुळता पाहून तो कसाबसा उद्गारला,

" खरं म्हणतेस ?—छे, असं कसं असेल कुंदे ? — "

" मलाच विचारतां ? " कुंदाच्या भेदरलेल्या चर्येवर कडवटपणा उमटून गेला. नवऱ्याला समजावून सांगावं लागलं, अन् तें सांगूनहि तो उलट प्रश्न करतो, हें पाहून ती त्रासून गेली. तिच्या आविर्भावानें आधींच गोंधळलेला धनंजय गोरामोरा झाला. त्याला जरा अपराध्यासारखें झालें. पण पुरुषी धीर आणून तो म्हणाला,

" शंकाच आहे ना नुसती ? – होईल सारं ठीक — "

" मला कांहीं समजत नाहीं -- कांहीं सुचत नाहीं -- " कुंदा निराशेनें उद्‌गारली. दोघांनीं एकमेकांची दृष्टि चुकवली व टेबलावर ठेवलेल्या बिलांच्या कागदी पेटीकडे, भिंतीला लावून ठेवलेल्या कपड्यांच्या ट्रंकांकडे व कोपऱ्यांत पडलेल्या बाळाच्या खेळांकडे फिरवली. सुपारीचीं खांडं धनंजयाला खिडकींत दिसलीं व उघड्या भांड्यावर माशा बसत आहेत हें कुंदाच्या लक्षांत आलें. दोघांनीं परत एकमेकांकडे पाहिलें. आजकाल पतिपत्नींत निर्माण झालेला नवा, नाजूक स्नेहधागा जरा कांपला गेला व दोघं आपापल्या कामाला लागलीं --

× × ×

ग्रॅहम ग्रीनची नवी कादंबरी घेऊन धनंजय रात्रींचा बराच वेळ बसला होता. आपल्या आवडत्या लेखकाचं नवं पुस्तक वाचायला तो ऑफिसांतून आल्यापासून उत्सुक होता. जेवण होईपर्यंत मुलाला खेळवावं लागलं. रात्रीची रेडियोवरची ' न्यूज ' संपेपर्यंत त्याला सवडच सांपडली नाहीं. मग तो अंथरुणावर आरामशीर वाचत पडला, पण बरींच पानं डोळ्याखालून गेलीं तरी मन गुंतेना. शेजारच्या बिऱ्हाडांतल्या घड्याळांत अकराचे ठोके पडले तेव्हां त्यानें पुस्तक मिटलें व मनाचा हिय्या करून तोंड वळवलें. पलिकडे भिंतीला टेकून कुंदा बाळाच्या कपड्यांच्या घड्या करीत बसली होती. तिच्याकडे पाहात तो म्हणाला,

" कुंदा — "

कुंदानें एकदम धनंजयकडे पाहिलें. तिच्या नजरेंतली भीति, भकासपणा वाढलेला होता. शंका नव्हे, तर तिची खात्रीच झाली होती आगामी संकटा-

बद्दल! धनंजयनें याचनेच्या दृष्टीनें तिच्याकडे पाहिलें. कुंदानें परत कपड्यां-कडे नजर वळवली व सावकाशीनें म्हटलें,

" इतर नाहीं कांहीं, पण बाळ किती लहान आहे अजून!— अन् लगेच — "

पाळण्याच्या मागें, भिंतीवर सहा महिन्यांपूर्वी पेन्सिलीनें लिहिलेली बाळाची जन्मवेळ निऑन् साईनसारखी चमकली, थरथरली. बाळंतपणासाठीं कुंदा माहेरीं गेली होती तेव्हांचा विरह व स्वातंत्र्य, आणि मुलाला घेऊन ती परतल्यावर सुरू झालेला गोंधळ व आनंद धनंजयच्या डोळयांपुढें गोळा झाला. हें सारं पुन्हां होणार, दुपटीनें होणार ह्या विचारानें तो सांवरून बसला व खोलींतल्या गर्दीकडे पाहूं लागला.

" बाळाची प्रकृति नीट नाहीं —" कुंदा गांठोडीं बांधीत म्हणाली, " अन् माझी तर सारखी परवड चाललेली आहे. बाळंतपणांत झालेल्या त्रासाच्या आठवणीनें अजून थरकांप होतो. असं वाटतं, कालच भोगलं तें दुःख! अन् लगेच उद्यांच..." कुंदाचा गळा दाटून आला. ज्या अग्निदिव्यांतून ती कांहीं महिन्यांपूर्वींच गेली होती तें परत पुढें उभं आहे ह्या जाणिवेनें तिला अंधेरी आली...

बाळाच्या कपड्यांचीं गाठोडीं पाळण्याखालीं, पलंगाखालीं परतलीं. कुंदानें कपाळावरचा घाम पदरानें टिपला व फुलपात्रभर पाण्याची धार तोंडांत सोडली. तिच्या फिक्कट, उंच गळयाकडे पाहतांना धनंजयला वाटलं कीं कांहींतरी धीराचं, विनोदाचं बोलावं. पण काय बोलावं तेंच त्याला उमगेना. ...छे, अजून संशयच आहे ना? होईल ठीक...कांहीं बिघडत नाहीं पुन्हां मूल होणार असलं तर...पलीकडच्या रावांच्याकडे तर दरवर्षीं पाळणा आहे... माझ्या आजीला अठरा मुलं होतीं नि दर खेपेला तिची नि मुलांची तब्येत सुधारत गेली...धीर धर कुंदा, इतकं भिण्यासारखं काय आहे?...छे, कांहींच हलकं फुलकं सुचेना त्याला! एकदम तो म्हणाला,

" उद्यां डॉक्टरांच्याकडे जाऊं या. बाळाचंहि वजन करायचंय्. लक्षांत आहे ना?"

" डॉक्टर रागावतील आतां! अन् लोकंहि हंसतील कांहीं दिवसांनीं.

धनंजय उशी उंच करून टेकून बसला व भिंतीवरच्या कुंदाच्या अवाढव्य सांवलीकडे पाहूं लागला. पुन्हां त्याला मागल्या वर्षीच्या आठवणी आल्या. किती फरक! — तेव्हां कुंदा नाचत म्हणाली, 'मला शंका येते — मला आनंदानें वेड्यासारखं झालंय्. चला, आपण आत्तांच डॉक्टरकडे जाऊं या!' तेव्हां कुंदा सारखी बडबडत होती, चारचौघांपुढून प्रौढीनें मिरवत होती. अभिमान, अपूर्वाई, पूर्तता, हट्टीपणा, लघटपणा; नि मग डोहाळजेवणं व हवं होतं तें गोजिरं मूल, मुलगा! -- अन् आज? — आज सारं उलटं अभद्र वाटत होतं. आज तीच कुंदा शरमिंदी झाली होती. 'मला भीति वाटते-- ' म्हणून म्हणत होती नि नवऱ्यापासून दुरावत होती. लोकांची, डॉक्टराची तिला लाज वाटत होती --

धनंजय उठला व म्हणाला, " असं नको बोलूं कुंदा, खात्री करून घेऊं आधीं — "

" माझी खात्री पटली आहे -- "

" मग तसं असलं तरी मार्ग काढूं आपण ! "

" कसला मार्ग? बाळंतपणाला पैसे कुठून आणणार? दागिने मोडणार कीं कर्ज काढणार? अन् पैसे आणले तरी करणार कुठें नि कोण? -- का परत मला माहेरीं पाठवून बाबांना अडचणींत टाकणार? -- "

संकट निवारण्यासाठींच जणूं धनंजय सरसावला होता, तो कुंदाच्या माऱ्यानें नामोहरम झाला. प्रसूतिवेदनेचं जहर कुंदा एक वेळ शांतपणें घेईल, पण हा सगळा खटाटोप कोणीं नि कसा सांभाळायचा हा प्रश्न होता खराच! ठराविक पगाराच्या व ठराविक माणसांच्या संसारांत आतां कसल्याहि संकटाला नि पाहुण्याला जागा नव्हती.

कुंदाच्या पुढून धनंजय तसाच हालला व पाळण्याकडे गेला. मच्छरदाणी दूर करून निजलेल्या बाळाकडे पाहात हलकेच म्हणाला,

" कुंदे–इकडे ये. झोंपेंत हंसतों आहे बघ — "

" दंगेखोर होत चाललाय् तो -- "

कुंदा पाळण्याकडे गेली व दुपटं बदलूं लागली. निजलेलं मूल किती सुंदर दिसतं! पाळण्यांतलं आपलं अपत्य जोडीनें पाहणं हें पतिपत्नीला केवढं सुखाचं वाटतं! कुंदा व धनंजय तें सुख रोज अनुभवीत. पण आज दोघं पाळण्याशीं

असून खुर्चीत नव्हतीं. हंसऱ्या बाळाच्या गोजिऱ्या चेहऱ्याकडे पाहून त्यांना जास्तच अनुकंपा वाटत होती.

मच्छरदाणी नीट लावून दोघं वळालीं. धनंजयला एक आठवलं. आलेलं संकट फिक्कट करायला एक चांगली बातमी होती खरी. तो म्हणाला,

" तुझ्या आतेबहिणीलाहि पुन्हां — "

" हो ! " कुंदा उद्गारली. आतेबहिणीच्या उदाहरणानें तिला तेवढंच कमी दुःख वाटेल अशी धनंजयची कल्पना होती. पण कुंदा पुढें म्हणाली,

" तिला पहिली मुलगी आहे ! म्हणून आतां लगेच दिवस गेले तरी मुलाच्या आशेनें ती धीर धरून आहे. मला जर पहिला मुलगा न होतां मुलगी झाली असती...तर कदाचित्..."

धनंजय तिच्याकडे आ वासून पाहातच राहिला. सगळ्याच गोष्टींचा तिनें सर्व बाजूंनीं विचार केला होता. कसलीच सुटका दिसत नव्हती तिला ! डॉक्टरांचा, माहेरचा, आतेबहिणीचा, कुणाचा आधार वाटत नव्हता तिला. नवऱ्याचा तर नाहींच नाहीं ! धनंजय पराभूत झाल्यासारखा पलंगावर पडला नि आढ्याकडे पाहात राहिला. अकस्मात् आलेलं हें संकट किती भीषण आहे ह्याची त्याला पुरी खात्री पटूं लागली....

पाळण्यांतून बाळाला काढून कुंदा त्याला पाजीत बसली. आजूबाजूचे उरले-सुरले आवाज रात्रीच्या अंमलाखालीं गुदमरून गप्प झाले होते. रहदारीची, रेडियोची गडबड अगदीं बंद झाली होती. अंधुक दिव्यांची, अवाढव्य सावल्यांची, टिकटिकणाऱ्या घड्याळांची व धडधडणाऱ्या काळजांची जाणीव वाढत होती. कुंदाच्या छातीशीं बाळ बिलगलं होतं; नि दुसरं पोटांत फिरत होतं. कसा जन्म द्यायचा त्याला ? कुठें वाढवायचा, कुणीं वाढवायचा ? कसं सगळं संभाळायचं ? विचारांचे तेच तेच वळसे कुंदाचीं डोळ्याभोंवतालचीं काळीं वर्तुळें अधिकच गडद करीत होते.

बाळाचं व आपलं आटोपून कुंदा आडवी झाली तेव्हां बारा वाजून गेले होते. धनंजय अजून आढ्याकडे पाहात जागत होता. आपण लग्न केलं पण नवरा कसं व्हावं ह्याचं शिक्षण घेतलं नाहीं. मूल झालं, पण बापाचीं कर्तव्यं कोणतीं तें माहीत करून घेतलं नाहीं. आटोपशीर संसार थाटला, पण तो आटोपशीरच कसा राहील हें पाहिलं नाहीं. सगळंच अर्धशिक्षित, अर्धकच्चं

झालं! तो अस्वस्थ झाला. आणि आतां हा जो घोटाळा......कुंदाला तो हळूच म्हणाला,

" सगळा घोटाळा झालाय् खरा, कुंदा. माझाच गाढवपणा!"

" तुमचाच कसला ?..." कुंदा डोक्यावरचा हात काढून म्हणाली. नवऱ्याकडे खूप स्नेहाळपणें पाहायचा तिनें यत्न केला. धनंजयला जरा बरं वाटल व तो हंसला. कुंदाहि हंसली, दोघंहि हंसूं लागलीं, अन् हंसतां हंसतां काळीजं पिळवटून गेलीं.

" छे—असं नको होतं व्हायला!" धनंजय म्हणाला, " लग्नानंतर दीड वर्षांनीं मूल झालं हें ठीक झालं. पण लगेच—"

" असूं दे आतां..." दोन मुलांच्या प्रौढ आईसारखं कुंदा उद्गारली. धनंजयनें उच्चारलेलींच वाक्यं ती परवांपासून डोकं फुटेपर्यंत घोकीत होती.

" सारे बेत आतां बदलावे लागणार! बँकेंत सारे दीडशें रुपये शिल्लक आहेत—" खरे सव्वाशें होते, पण धनंजयच्या तोंडांत एकदम जास्त आंकडा आला.

" पण अजून खूप अवकाश आहे. खेरीज—"

" आजच विमा—एजंट भेटला होता." आपल्याच नादांत धनंजय रुद्धपणें सांगूं लागला, " बाळासाठीं आत्तांपासून पैसे ठेवायची चांगली योजना होती त्याच्याजवळ. पण आतां बाळाबद्दलचे सारेच बेत बारगळणार—"

कुंदानें दचकून पाळण्याकडे पाहिलें व म्हटलें, " असं कसं ?"

" नाहींतर काय! शिल्लक राहणार नाहीं आतां. नि राहिली तर त्यांत दोन वांटे! मुलाला खूप शिक्षण द्यायचं, मिलिटरी कॉलेजांत घालायचं असे आपले मनोरे!—पण आतां ? दुप्पट खर्च..."

" असं कसं ? बाळाचे कपडे, खेळणीं, पुस्तकं, धाकट्याला होतील."

" पण शिक्षणाचं काय ?—"

" पाहतां येईल. निजा आतां—" वरकरणी सहज, पण काळजाला तडे पडूं लागले म्हणून कुंदा कुशीवर वळून म्हणाली. धनंजय मात्र पित्याच्या चिंतेंत गुरफटला गेला. एकाला मिलिटरींत मेजर करायचा बेत सोडून दोघांना पोलिसांत जेमतेम हवालदार करावं लागणार! एक मेजरऐवजीं दोन हवालदार, एका इंजिनीअरऐवजीं दोन मुकादम, एका प्रोफेसरऐवजीं दोघं मास्तर... धनंजयच्या डोक्यांत कोष्टकं तयार होऊं लागलीं!

भांडण झालं नसतांना आज प्रथमच दोघंजणं एकमेकांकडे पाठ करून निजलीं. संसार थाटल्यापासून आज प्रथमच दोन खोल्यांची जागा धर्मशाळे-सारखी वाटूं लागली. रोज रात्रीं फुलणारी स्वप्नांची बाग बेचिराख झाल्या-सारखी भासूं लागली.

...अपरात्रीं केव्हां तरी बाळ रडतो आहे असा भास दोघांना एकदमच झाला. दोघंहि उठलीं नाहींत. कुंदा डोकेंदुखीमुळें, धनंजय नेहमींच्या आळसामुळें. बाळ जास्तच रडूं लागला तेव्हां कुठें दोघांची झोंप साफ उडाली. धनंजय त्रासून म्हणाला,

"बाळ रडतो आहे केवढा वेळचा — घे त्याला..."

"तुम्हीच बघा त्याला...मी दमलेंय्. तुम्हांलाच संवय करायला हवी आतां —" कुंदा जडावलेल्या पापण्यांच्या ओझ्याखालीं दबून उद्गारली.

धनंजयनें डोळ्यांवरून पांघरूण घेतलें, पण मग एकदम डोकं बाहेर काढून तो अंधारांत डोळे फाडून पाहूं लागला. दमलेल्या झोंपलेल्या अवस्थेंत विसरलेलं संकट त्याला आठवलं व तो भयंकर दचकला. 'तुम्हांलाच संवय करायला हवी आतां — तुम्हीच घ्या बाळाला —' कुंदाचीं वाक्यं काळीज पोखरूं लागलीं. आजवर अपरात्रीं उठून तो बाळाला घेतहि असे. पण आतां — ह्यापुढें...

कुंदा झटकन् उठली. कपाळाला आंठ्या घालून बाळाला तिनें पाळण्यांतून काढलें व परत गादीवर आडवं होऊन बाळाला ती घेऊं लागली. दुधाचा थेंब थरथरणाऱ्या ओठांना लागतांच बाळाचें रडें थांबलें. पण कुंदाच्या डोळ्यांत पाणी ठिबकलें. 'बाळाला तोडावं लागणार–' तिचं मन विव्हळलं! बाळाबद्दल मायेचा पान्हा फुटला, पण पोटांत दुखतं आहे ह्या भासानें ती तशीच पडून राहिली. पोटांतला गर्भ बाळाला कुंदापासून दूर ढकलीत होता.— अन् धनंजय तर पार कोंपऱ्यांत पडला होता...

...घ्या, आणीक एक शेराचा रतीब लावा. मोठ्याला निदान वरचं दूध असूं द्या. अजून कित्ती लहान आहे. दुधावर वाढायचं त्याचं वय आहे — सगुणा गवळण म्हणत होती.

धाकटा झाल्यापासून थोरल्याची अबाळच चालूं आहे हो! आईला बिचारीला उसंत नाहीं. मुलांना आजी किंवा मावशी तरी हवी होती. आंघोळ,

घालायची, वेळीं निजवायचं, खायला द्यायचं, खेळायचं! बाळ एकटा असतो बिचारा सारा वेळ—शेजारीण कुणाला तरी सांगत होती.

बाप करतो थोरल्याचं! त्याच्याचकडे असतो तो. पण जमतंय् का त्याला? सगळयांचीच परवड—आणीक कुणी म्हणालं.

दुसरं पोर तरी किती अशक्त आहे! गर्भारपणीं आईला विश्रांति नव्हती. मुलांचा नि संसाराचा त्रास. आतां आईहि आजारी नि नवं मूलहि रिकेटी—

दुसऱ्याच्या अंगावर सगळे जुने, पहिल्याचे कपडे दिसताहेत. त्याचं कांहीं कौतुक नाहीं नि पहिल्याकडेहि लक्ष नाहीं...

—अनेक आवाज अन् अनेक उलटींसुलटीं वाक्यें रातकिड्यांसारखीं केंकाटत होतीं! रात्र घाईनें उलटून गेली. श्रमानें, दुःखानें कुंदा लाकडासारखी निपचित पडली होती. आगामी संकटाच्या भीतीनें तिच्या हृदयाचा लोळागोळा झाला होता. पुढयांतल्या मुलाबद्दल, पोटांतल्या मुलाबद्दल, नवऱ्याबद्दल, संसाराबद्दल, तिला विलक्षण काळजी वाटत होती; नि चीडहि येत होती! धनंजय तिच्याकडे, तिच्या पोटाकडे, पोराकडे, व खोलींतल्या अंधेराकडे पाहात पडलेला होता. शरमेनें, भीतीनें, पश्चात्तापानें त्याला झोंप येत नव्हती....

× × ×

उन्हं बरींच वर आलीं तरी कुंदाचं कांहीं झालं नव्हतं. तिला कांहीं करवत नव्हतं. स्वैंपाकांत सगळा गोंधळ झाला होता नि दहा वाजेपर्यंत धनंजयसाठीं दोन पोळया नि भाजी तरी तयार व्हायला हवी होती. कुकर लावून ती चार तांबे अंगावर घ्यायला मोरींत गेली तों तिला घेरीच आली...

धनंजय बाहेरून परतला तेव्हां आंघोळ घालून व दूध पाजून बाळाला निजविण्यांत कुंदा गर्क होती. पाळण्यावर वाकलेली व कोरडं अंगाईगीत म्हणणारी ती वीस वर्षांची अजाण आई पाहून त्या कारकुनाला कसंसंच झालं. पण तो खुषींत होता. हातपाय न गाळतां संकटावर मात करायचा त्याचा बेत होता. रात्रभर जागून, सकाळभर भटकून व चार मित्रांचा सल्ला घेऊन त्यानें बेत पक्का केला होता. आवेशांत त्यानें कोट उतरवला व कुंदाला म्हटलें,

"निजला बाळ?—"

"आंघोळ करा आतां. दहा वाजायला आले–" कुंदा त्याच्याकडे न पाहतां म्हणाली व स्वैंपाकघरांत शिरली.

कुंदाच्या बोलण्यावागण्यांतला कडवटपणा लवकरच जाईल, ह्या विचारानें धनंजय अधिक उत्साहानें तिच्या मागोमाग स्वैंपाकघरांत गेला.

“ कसं वाटतंय, कुंदा ? ”

“ काय वाटायचंय् ? ”

“ हें बघ. आपण उगाच भिऊन संकट अंगावर घेण्यांत अर्थ नाहीं. मीं विचार केलाय्. औषध घ्यायचं ! हें बघ, एक खास दवा आणलाय्. तो घे, कीं – ” कोटाच्या खिशांतली बाटली आणायला तो वळाला.

कुंदाच्या डोळ्यांत क्षणमात्र आनंद तरळला. सुटकेचा मार्ग जवळच आहे तर ! —पण तिनें एकदम नवऱ्याची बाही पकडली व म्हटलं,

“ कशाला औषधाला खर्च केलांत ? — ”

“ म्हणजे ? — ”

“ माझ्या आतेबहिणीनीं खूप औषधं घेतलीं. उपयोग होतोच असं नाहीं. आणि मी औषध वगैरे घेणार नाहीं ! माझ्या मनाची मीं तयारी केली आहे ! आतां...द्यायचंच असलं तर एक वचन द्या —”

धनंजय तिच्याकडे बघतच राहिला. ही सोडवणुकीचा मार्ग कां टाळते आहे, त्याला कळेना !

“ —वचन द्या कीं पुन्हां असा प्रसंग येणार नाहीं म्हणून ! —दोन पुष्कळ झालीं. एकाला मारून दुसऱ्याला वाढवण्याची माझी तयारी नाहीं. पण-पण आतां आणखी नको, ह्यापुढें कांहीं नको...”

धनंजयला त्या बाटलीचं काय करावं हें बराच वेळ समजेना. आंघोळ करून चार घांस खाऊन उत्साह वाटेना. कुंदा रागवेल म्हणून तो कामावर जाणार होता... आणि तो जाण्याच्या आधीं अंथरुणावर आडवं होणं वाईट दिसेल म्हणून कुंदा इकडे तिकडे करीत होती... वाजवीपेक्षां जास्त माणसांनीं भरलेली गाडी ढकलत जावी तसा त्यांचा संसार रखडत सुरू होता.

—आणि पाळण्यांत स्वतःशीं खेळणारा बाळ केविलवाणा हंसत होता !

• • •

. १० .

# गंधवार्ता

बेकरलेनच्या टोंकाला असलेला म्युनिसिपालिटीचा दिवा फुटक्या कांचेतून फिकट उजेड देत होता. एका बाजूचा जमिनीचा बेवारशी तुकडा काळया भुऱ्या अंधारांत अदृश्य होत होता. डुकराचीं पिलें, कोंबडीचीं पिलें व माणसाचीं पिलें त्या जागेंत दिवसभर हुंदडलीं होतीं. त्यांचे खेळ आठवीत तेथलें म्हाताऱ्या आजीसारखें वाकलेलें व सुरकुतलेलें शंकासूराचें झाड आतां स्तब्ध उभें होतें. दुसऱ्या बाजूला बेकरलेनचा चिंचोळा, चढण आलेला रस्ता घरांच्या उजेडामुळें कमीजास्त चमकत, शेवटीं हमरस्त्याच्या झगझगाटांत मिळून गेला होता. एका दिशेकडची गर्दीगोंधळ व दुसरीकडची स्मशान-शांतता ह्यांमध्यें बेकरलेनचीं पांचपंचवीस बुटकीं, बेढब घरें दाटीवाटीनें उभीं होतीं. घराघरांतून येणारे चुलींतले धूर व फोनोवरची घरघर, दारादाराशीं दिसणाऱ्या शेळया व सायकली, आणि रस्त्यावर उगाच उभे असणारे अगर घाईनें ये-जा करणारे लोक ह्यांनीं साऱ्या वस्तीला विचित्र स्वरूप आलें होतें.

दिव्याच्या खांबाला टेकून फ्रान्सिस नागूची नऊ वर्षांची मुलगी मेरी उभी होती. विटक्या फ्रॉकमध्यें तिचें लुकडें अंग झाकलें होतें आणि चपट्याशा डोक्यावर लांडे केस चोपून बसवले होते. वहाणारें नाक साफ करीत ती खांबाला हात पुशीत होती. मध्येंच चापट्या मारून पायावर बसणारे डांस उडवीत होती. पण हें सगळें नकळत चाललें होतें. तिचा इवलासा जीव डोळयांत गोळा झाला होता. कुरूपतेचा, काळेपणाचा विसर पडेल असे तिचे काळेशार नि टपोरे डोळे वेडयासारखे चौफेर पाहात होते. कुणाचा तरी वेध घेत होते.

बखळीच्या बाजूनें बुटांचे आवाज आले आणि मेरीनें चमकून पाहिलें.

खाकी वेषांतलीं दोन धिप्पाड माणसें शंकासूराखालून येत होतीं. पोलिस!—मेरी पुटपुटली व तिची काया मोहरून आली. गेले दोनतीन दिवस ती पोलिसांची मार्गप्रतीक्षा करीत होती. आज तर संध्याकाळ व्हायच्या आंतच तिनें खेळ आवरला होता व पोलिस केव्हां व कसे येतील ह्याचा विचार करीत ती घराच्या दारांत बसून राहिली होती, हमरस्त्यावरच्या इराणी हॉटेलजवळ रेंगाळली होती, आणि रात्र पडली तरी घरीं न जातां ह्या दिव्याखालीं ताटकळून होती. पोलिस कसे दिसतात, कसे गुपचुप येतात, घराला एकदम वेढा घालून आपल्या आईबापांना कसें पकडतात, हें सारें सारें तिला पाहायचें होतें. अन् आतां तिला तें खरेंच पाहायला मिळणार होतें!

घराकडे धूम ठोकावी आणि खुराड्याआड लपून सगळी गंमत पाहावी असें मेरीला वाटलें. पण शंकासुराखालीं दोघेहि पोलिस थांबल्यानें मेरीहि थबकली. त्या झाडाखालीं आज सकाळीं तिनें बांगड्यांचे तुकडे नि मणी पुरून ठेवले होते. ते पोलिसांना सांपडतील ह्या कल्पनेनें ती भेदरली. शेजारच्या चिंगीची निळी बांगडी आपण पळवून, तिचे तुकडे करून पुरले हें पोलिसांना कळेल अन् मग आपल्यालाच ते पकडतील!—क्षणभर आपल्यालाहि पकडावें असें मेरीला वाटलें. खांबाला घातलेला विळखा सोडून मेरी पुढें झाली. झाडाखालीं दोघे बोलत वेळ फुकट घालवीत आहेत ह्या भावनेनें ती अधीरी झाली. शिव्या, धरपकड, रडारड, फरफटत ओढणं, तुरुंगांत टाकणं, बाबांचे बांधलेले हातपाय, आईचा हंबरडा, जमलेल्या लोकांचा...मेरीच्या लपवलेल्या, गोंजारलेल्या कल्पना आतां भराभर झेप घेऊं लागल्या.

तेवढ्यांत दोघेजणांतला एक मागें फिरला व दुसरा सावकाशीनें बेकरलेनकडे येऊं लागला. मेरीला फसल्यासारखें वाटलें. ती खरोखरीच फसली होती. येणारा मनुष्य पोलिस नसून शेजारच्या आळींतला अंडरटेकर होता. जुन्या बाजारांतून आणलेले मिलिटरीचे बूट व खाकी डगला घातल्यामुळें शिपायासारखा दिसत होता तो!

"काय ग मेरी, इथें उभं राहून काय करतेस! रुसून उभी आहेस काय? चल घरीं—" अंडरटेकर तिच्याजवळ येऊन म्हणाला.

"नको—इथंच उभी राहणार मी!" मेरी नाक फेंदारून म्हणाली.

अंडरटेकरनें डोळे मिचकवले व जातां जातां म्हटलें, "हां—पहारा होय?"

मेरी आधींच फजीत झाली होती. तशांत अंडरटेकरचें तें खोचक बोलणें ऐकून तिला शरमल्यासारखें झालें. त्याच्या नाहींशा होणाऱ्या आकृतीकडे पाहात तीहि मग घराकडे निघाली. पोलिसांची वाट पाहायची तरी कोठवर ? नेहमीं इकडे तिकडे हिंडणारे व लहान मुलांना भय दाखवणारे शिपाई आतां कुठें लपून बसले ? दमलेली, निराश झालेली मेरी आपल्या घराशीं आली व कट्ट्यावर आजा बसला होता त्याच्या पुढ्यांत गेली.

घरापुढच्या उंच कट्ट्यावर बुड्ढा नागू विडी फुंकीत उकिडवा बसला होता. दोनतीन मिनिटांनीं तो ठसकत होता व रस्त्याच्या दोन्ही दिशांना आपले खोल डोळे फिरवीत होता. संध्याकाळ झाली कीं तो असा पहाऱ्यावर बसे तो रात्र पडेपर्यंत !

मेरीचें डोकें कुरवाळीत नागू म्हणाला, " काय ग पोरी, कुठं हिंडत होतीस ? आईला तुझ्याकडे बघायला वेळ नाहीं म्हणून रात्रीचंहि भटकत असतेस होय ? "

मेरी आज्याचा हात पकडून तीव्रतेनें म्हणाली, " साहेबा, खरंच पोलिस नाहीं येणार ? "

म्हातारा खोल हंसला. " हें काय काढलंस कालपासून ? पोलिस कसे पकडतात, त्यांची आपल्याला कशी भीति आहे, हें गंमतीनं सांगितलं, म्हणून होय ? अग, कांहीं झालं तरी पोलिस धरणार नाहींत आपल्याला ! पोलिसांचे बाप लागून गेलेले बडे लोक इथं येतात. अन् मी इथं बसलों आहे ना सारखा इशारा द्यायला ! येशूची कृपा असली —"

" म्हणजे मग घरांत धरपकड नाहीं व्हायची तर !—" मेरी आज्याचा हात सोडून निराशेनें उद्गारली. आपण उगाच इतका वेळ वाट पाहिली, आपल्याला कांहींच गंमत पाहायला मिळणार नाहीं, ह्या जाणिवेनें ती रडवेली झाली.

तेवढ्यांत सूटबूट घातलेले तीनचार लोक दबकत घराशीं आले व इकडे तिकडे बघत ठेंगण्या चौकटींतून आंत गेले. मेरी त्यांच्याकडे टक लावून पाहात होती. अंधार पडला कीं सुरू होणारी ही बड्या लोकांची वर्दळ पाहायला तिला मोठी गंमत वाटे. घाईनें, घाबऱ्याघाबऱ्या हे लोक कुठून कुठून येत. पूर्वी ह्या गल्लींत बाहेरचें शेंबडें पोरहि येत नसे. आतां इतक्या लोकांना मेरीच्या

घराचा पत्ता कोण सांगतो कुणास ठाऊक ! त्यांची घरांत शिरण्याचीहि घाई नि बाहेर पडण्याची घाई. फ्रान्सिस नागूचीं ते आर्जवें करीत व तो सांगेल तितके पैसे देत. कपांतून, ग्लासांतून मिळेल ते भसाभस पीत व घाम पुशीत निघून जात —

मेरी एकदम उठली व दारांत जाऊन उभी राहिली. पडदा लावून तयार केलेल्या बाहेरच्या खोलींत ते पाहुणे खुर्चीवर, खोक्यावर, रचलेल्या गाद्यांवर बसले होते. वारा घेत हलक्या आवाजांत कुजबुजत होते. भिंतीला मारलेल्या फळीवरच्या मेणबत्तीचा उदास उजेड जेमतेम येत होता. त्यामुळें प्रभु येशूचें व डॉक्टर आंबेडकरांचें चित्र काळोखांत लपेटलें होतें, तर पाहुण्यांचे चेहरे उजळून जात होते. मेरीला पाहतांच त्यांतला नेहमीं येणारा इसम हंसला. आपल्या सोबत्यांना सांगूं लागला, " फ्रान्सिसची छोकरी ही ! -- मोठी धीट आहे —"

" तुम्हीच धीट आहांत —" मेरी एकदम म्हणाली. चेहरे चमत्कारिक करीत पाहुणे हंसले व आंत गेलेला फ्रान्सिस अजून येत नाहीं म्हणून अधिकच घाबरे झाले. एक कोवळा तरुण हलकेच म्हणाला, " नाहीं तर जाऊं या परत —"

पण फ्रान्सिस लगेच आलाच. त्याच्या त्या खप्पड चेहऱ्यावर हास्य पसरलें होतें व हातांत कपबशा होत्या. " चहा घ्या —" कप पुढें करीत तो पाहुण्यांना म्हणाला.

नवख्या लोकांनीं रस्त्याकडे पाहात कप घेतले. जाणता इसम मोकळेपणाचा आव आणीत म्हणाला, " काय रे बुवा, चांगली आहे ना ? — अस्सल —"

" वा साहेब, फ्रान्सिस स्पेशल आहे ही ! " कोपऱ्यांत अदबीनें उभा असलेला फ्रान्सिस म्हणाला व आपले काळे केस व पांढऱ्या मिशा कुरवाळूं लागला. पाहुण्यांची खात्री करण्यासाठीं त्यानें पॅंटच्या खिशांतून काड्याची पेटी काढली व एका बशींत थोडेंसें पेय ओतून त्याला काडी लावली. बशींतून लहानशा लाल निळ्या ज्वाळा निघूं लागल्या. फ्रान्सिसचा, पाहुण्यांचा, भिंतीवरच्या देवतांचा चेहरा उजळून निघाला.

मेरी सारें पाहात होती. रोजचेंच दृश्य पुन्हां पाहात होती. पण बशींतली आग पाहतांच आज तिला एकदम वाटलें कीं ह्या क्षणीं पोलिस यावेत ! काय

काय मजा होईल मग ! हा शिष्ट इसम खरेंच पोलिसांना गप्प करील ? अन् हा मडमेसारखा दिसणारा माणूस नक्कीच गळा काढील. बापाच्या हातापायांना दोरीनें बांधतील अन् आंतून आई ओरडत येईल...

ज्वाळा विझल्या व सर्वजण खुर्षीत मदिरापान करूं लागले, तेव्हां मेरीचे विचार थांबले. आजा खात्री देतो नि बाप छाती पुढें काढीत वागतो खरा, पण हे सर्वजण पोलिसला भितात ह्याची तिला खात्री पटली. ती स्वतःशींच खुदकन् हंसली नि शिपायासारखीं पावलं टाकीत सर्वांच्या अंगावरून आंत घरांत गेली.

" कुठें गेली होतीस मरायला ?—" तिला पाहतांच आई म्हणाली. आतां तिचं लठ्ठ शरीर बरंच झडलं होतं व डोकेदुखीहि कमी झाली होती. हल्लीं खूप काम करावं लागत असे तरी ती खुशींत होती. गळयांत सोन्याचे दोन डाग रुळत होते व कमरेला पैशाची पिशवी खुळखुळत होती आतां.

" खाया दे मला. " मेरी चुलीजवळ फतकल घालून बसली व जवळची एनॅमलची बशी वाजवूं लागली. घरांतल्या चलतीमुळें मेरीला खाऊला रोज पैसा—आणा मिळे व केसांतल्या उवा काढून घ्यायचा त्रास नसे. तरी पण त्यांतला आनंद आतां कमी झाला होता. उलट आई आपल्याला हिडीसफिडीस करते, कुठें नेत नाहीं, सारखी बाहेर धाडते व गप्प बसायचा दम देते, ह्याची तिला चीड आली होती. आई आपल्याच नादांत आहेसें पाहून ती परत ओरडली, " दे कीं कांहीं तरी. भूक लागली मला—"

" गिळ एकदांची !—" आईनें तिच्या हातांतली बशी हिसकली व त्यांत दुपारची गाजराची भाजी व डबलरोटीचा लचका टाकला. मेरीनें आईच्या देखत कोपऱ्यांतला डबा उघडला व गुळाचा खडा काढून घेतला. आई कांहीं बोलली तर आईला ती पोलिसचें भय दाखवणार होती. पण आईचें लक्षच नव्हतें. पातेल्यांतलें रसायन बाटल्यांत भरण्यांत ती गर्क होती.

खाण्याच्या नादांत मेरी सगळेच विचार विसरून गेली. तिला भूक लागली होती नि झोंपहि येत होती. बाहेरचे लोक निघून गेले. फ्रान्सिसनें कपबशा आंत आणल्या. आईनें विसळून पालथ्या घातल्या. दोघीहि मग बाहेर ठेवलेल्या पैशाच्या पेटीकडे गेल्या व रिकाम्या स्वैंपाकघरांत धूर भरून राहिला.

तेवढ्यांत मागचें दार वाजलें व सायकल दाराला टेकवून जॉन स्वैंपाकघरांत

आला. मेरीनें त्याच्याकडे पाहून अभावितपणें स्मित केलें. पण मग तिच्या लक्षांत आलें कीं जॉन आतां पूर्वीचा राहिला नाहीं. पूर्वी तो रेसकोर्सवर तबेल्यांत कामाला जाई, तेव्हां कित्येकदां मेरीला नेई. रात्रीं दुलईत गुरफटून दोघें निजलीं कीं मेरीच्या कुठल्याहि शंकेचें तो उत्तर देई. पण आतां तो बदलला होता. एकदम मोठा दिसूं लागला होता नि मोठ्या माणसासारखा वागत होता. सकाळीं मंडईतून तो सडकीं मोसंबीं आणीत असे नि रात्रीं रबरी पिशव्यांतून दारू नेत असे. मेरीनें कांहीं विचारलें कीं वसकन् ओरडे. सारा वेळ आईबापांशीं बोलत असे... मेरीनें परत फुगीर चेहरा केला व जॉनचे नवे पांढरे बूट पाहात बशी चाटून साफ करायला सुरुवात केली.

जॉननें स्वैंपाकघराचें दार बंद केलें व सदरा वर उचलून पाटलोणींत खोचलेली रबराची शेकपिशवी बाहेर काढली. कुणाकडे तरी दारू पोंचवून तो परत आला होता. मेरीला एकदम भिस्त्याची आठवण आली. त्याच्या पखालींत...ती खुदकन् हंसली. जॉननें आठ्या घालून पाहिलें तशी वरमली.

" बा कुठंय् ग —" धापा टाकीत जॉन म्हणाला.

" जॉनी, तुला पोलिसची भीति नाहीं वाटत ?—" मेरीनें न राहवल्या-मुळें विचारलें.

" शट् अप् ! " घाम पुसतां पुसतां जॉन ओरडला. बहीणभावांचा झगडा ऐकतांच आईबाप धांवत आंत आले. जॉन बापाकडे पाहात उद्गारला,

" साली, पोलिसचं भय दाखवते —"

" चावट आहे मेली ! " आई मेरीला मारायला पुढें धांवली. मेरी एकदम बाजूला सरली व आईकडे, जॉनकडे खुनशीपणानें पाहूं लागली. आई आणीकच कडाडली, " हात धू नि बाहेर हो —"

" मला झोंप येत्येय्." मेरी आळोखेपिळोखे देत म्हणाली. जॉननें खिशांतून काढलेल्या नोटांकडे आईबापांचें लक्ष गेलें नि खोलींत एकदम शांतता झाली. मेरीनें बोटें चाटलीं, हात धुतले, बशी पायानें दूर सारली व कोपऱ्यांतल्या चिरगुटांच्या ढिगावर ती आडवी झाली...

खोलींतल्या पडद्याच्या पार्टिशनशीं उभें राहून तिघांचा नोटांचा नि बाटल्यांचा हिशेब रंगांत आला होता. पेंगुळलेल्या मेरीच्या मनांत रुसवा, रुष्टता भरत होती. जॉनबद्दल राग, आईबद्दल राग, बापाबद्दल, आजाबद्दल राग.

आणि पोलिसांच्याबद्दलहि राग! कुणीच तिला विचारीत नव्हते. सगळे तिला हिडीसफिडीस करीत होते. अन् पोलिस तर येतच नव्हते! ते आले असते तर घरांतल्यांची चांगली जिरली असती नि मेरीला मोठी गंमत पाहायला मिळाली असती. दरवडेखोरांच्या, भुतांच्या गोष्टींतल्यासारखी! पण तिचें कुणी ऐकत नव्हतें...मेरीला रडूं कोसळलें. डोकें घाशीत ती चिरगुटावर किती तरी वेळ पडली होती...

—एकदम तरारून ती उठली. वेडींवांकडीं स्वप्नें तिला पडत होतीं. घाईनें ती उठून बसली, पण काय स्वप्न पडलें हें तिला आठवेना. डोळे मोठे करून ती भोंवतालीं पाहूं लागली. सारें आहे तसेंच चालू होतें. चुलीजवळ मोठें भांडें तयार होतें. रबरी शेकपिशवी भरून घेऊन जॉन कुठें तरी निघाला होता. बाहेरच्या खोलींत माणसें येत होतीं. ग्लास भरत होते, पैसे जमा होत होते, रंगीत ज्वाळा मध्येंच दिसत होत्या...

मेरी झपाटल्यासारखी उठली. चुलींतला धूर डोळ्यांत जाऊन तिचे डोळे चुरचुरले. तिला वाटलें, दारू पिऊन लाल होतात तसे आपले डोळे लाल झाले आहेत. दारुड्यासारखें मुद्दाम चालत ती पडद्याशीं आली. वाटेंत ठेवलेला कप खळकन् फुटला व आईनें चारचौघांदेखत मेरीला चापटी मारली. मेरीला उलटून मारावेंसें वाटलें, पण आईकडे ती वेगळयाच दृष्टीनें पाहूं लागली. “ मार, मार, अखेरचं छळून घे—” ती स्वतःशींच पुटपुटली व बाहेरच्या खोलींत डोकावूं लागली. “ साहेब, फ्रान्सिस स्पेशल आहे ही! ” बापाचें नेहमींचें, पण नव्या उत्साहानें उच्चारलेलें वाक्य तिच्या कानावर पडलें नि तिचें तोंड कडू झालें. ‘ फ्रान्सिस स्पेशल आहे, फ्रान्सिस स्पेशल आहे, फ्रान्सिस...’ तेंच वाक्य तिच्या कानावर सारखें आदळूं लागलें. अन् मग बशींत ज्वाळा दिसूं लागल्या. अस्सल मदिरेचें अग्निदिव्य! ज्वाळा सारख्या वाढूं लागल्या. त्या कौलारापर्यंत गेल्या, तशी मेरी नाचत टाळया वाजवूं लागली.

“ वा, डान्स करते वाटतं तुझी मुलगी?—” झिंगलेला पाहुणा म्हणाला.

“ डान्स कसला, साहेब! लहान आहे. जा मेरी, आज्याकडे जा बाहेर—” फ्रान्सिसनें मेरीला बाजूला लोटलें.

मेरीला वाटलें, पुढें होऊन त्या लठ्ठ माणसाच्या मोठ्या पोटावर लटकणारी घड्याळाची सांखळी काढावी व तिनें त्याला बांधावें, पण तिला विलक्षण झोंप

ग्र होती. घरांत पळालें तर कांचा पायांत जातील व आई पुन्हां मारील ह्या
यानें ती तशीच उभी राहिली. अन् मग मेणबत्ती धरून चालावें तसें जपून
ालत ती बाहेरच्या दाराकडे गेली. दारांतून दोन धोतरवाले बुवा घाईनें आंत
त होते. मेरी बाजूला सरायला गेली, पण त्यांच्या धोतरांच्या सोग्यांतच
डकून पडली. त्या लोकांनीं तिला उचललें व तिचे कपाळावर आलेले केस
गें करीत तिची चौकशी केली. मेरी त्यांच्याकडे आठ्या घालून पाहूं लागली.
कानें तिला खिशांतून पेपरमिंटाची वडी काढून दिली. मेरीनें ती घेतली नि
मिनीवर आपटली. तशीच ती उंबरठ्यावर बसली आणि बाहेर पाहूं
ागली...

खोलींत मदिरापान सुरू झालें अन् त्रस्त झालेली, झोंपमोड झाल्यानें
स्तच चिडलेली मेरी उंबरठ्यावर डोकें खाजवीत बसली. तिनें आईला कपबशा
सळायला मदत केली असती, बाला काड्याची पेटी आणून दिली असती,
ऱ्हाइकाला सिगरेट नि चणे आणून दिले असते. निदान आज्यापेक्षां चांगल्या
तीनें बाहेर उभें राहून पहारा केला असता. हवें तर कमिटीच्या दिव्याशीं
ार इराण्याच्या हॉटेलजवळ उभें राहून पोलिस दिसतांच खूण केली असती!
ा तिला कुणी काम देत नव्हतें. उलट, कांहीं विचारलें तर तिला मार मिळे
घराबाहेर हाकललें जाई. मेरीचें दुःख परत ठणकूं लागलें. पण आतां रडूं
्याऐवजीं तिला चीड आली. अन् वाटलें कीं घराबाहेरच पडावें आपण!
ांतून नाहींसेंच व्हावें!

नकळत ती दारांत उभी राहिली. बाहेरच्या अंधाराकडे पाहूं लागली.
ावलेल्या तिच्या डोळ्यांना नीट दिसत नव्हतें. अन् दिसत होतें तें सारें
चित्र होतें...शंकासुराचें झाड अगदीं समोर उभें होतें. अन् त्याच्या
यांना मणी नि बांगड्यांचे तुकडे लटकत होते. झाडाखालीं कप हातांत
ऊन श्रीमंत गिऱ्हाइकें दारू पिऊन नाचत होतीं. खराटा घेऊन जॉन त्यांचीं
ीं साफ करीत होता. आणि फ्रान्सिस पोलिसांना काड्याची पेटी देत होता.
ातारा नागू तर कुठें दिसतच नव्हता नि आई एकसारखी ओरडत होती...

मेरीचें डोकें जड होऊं लागलें. पण तिनें आज्याची आठवण होतांच डोळे
डून पाहिलें. खरेंच, बुड्ढा नागू कट्ट्यावर नव्हता! मेरी कट्ट्याजवळ आली व
होंकडे बघूं लागली. नागू नव्हता. तो जेवायला अगर नळावर गेला

असेल असें मेरीला वाटलें व ती तिथेंच थबकली. आजा येईपर्यंत आपण पहारा करावा व दुरून पोलिस दिसला कीं...

मेरी पुन्हां दचकली. पहारा नाहीं म्हणून पोलिस यायची शक्यता आहे ह्या जाणिवेनें ती तरारून गेली ! बेकरलेनच्या दोन्ही टोंकांना अधीरी होऊन पाहूं लागली. केवढी नामी संधि होती ! सरळ घरांत घुसायचें, लोकांना पकडायचें, बाला दोरखंडानें बांधायचें, आईला...मनांतलीं दृश्यें बशींतल्या रंगीत ज्वाळांसारखीं डोळयांपुढें तरळूं लागलीं. खुनशीपणानें, सूडाच्या विचित्र आनंदानें ती छोटी पोर वेडावून गेली.

— पण नुसता किर्रर्र अंधार पडला आहे हें तिच्या लक्षांत आलें व ती भानावर येऊं लागली. पेंगुळलेलीं घरें, थंड पडलेलें खुराडें, बाजूच्या गटाराशीं लपलप करणारीं डुकरें, अन् शांतपणें चालू असलेलें दारूचें दुकान...मेरीची चुळबुळ झाली. हें असेंच चालायचें ? आपल्याला सूड घ्यायला, गंमत पाहायला नाहींच मिळायची ?...

अचानक तिनें कट्ट्यावरून उडी घेतली व बेकरलेनच्या चढणीवरून ती धांवूं लागली. कसल्याशा कल्पनेनें ती पेटून निघाली होती. कधीं नाहीं तो धीर तिला आला होता. अंधाऱ्या बोळांतून ती मोठ्या रस्त्यावर आली व गोंधळून थांबली. विजेच्या दिव्यांचा झगझगाट व बाजूच्या इराण्याच्या हॉटेलांतला गलका...त्या उजेडानें नि आरड्यानें ती अधिकच चेकाळली. झिंगलेल्या माणसासारखी तिची स्थिति झाली. बाजूला असलेला अंडीवाला ओळखील व हटकील ह्याची तिला भीति वाटली नाहीं. ती आतां कुणाला भिणार नव्हती. दुसऱ्यालाच भिवविणार होती...

शांतपणें उभ्या असलेल्या चर्चच्या आवारांत मेरी शिरली व मधल्या वाटेनें बाजाररस्त्याला लागली. बाजार बंद झाला होता, पण वाहनें चालू होतीं व दिवेहि लागलेले होते. वळणावरच्या सिनेमागृहाशीं तर गर्दी नि झगझगाट होता. मेरी आवेशानें पळत होती. एकाच विचारानें तिचे सारे अवयव अधीरे झाले होते. सिनेमागृहाच्या जरा पुढें गेलें कीं पोलिस – चौकी लागते हें तिला पक्कें माहीत होतें. जॉनबरोबर रेसकोर्सवर जातांना नि बापाबरोबर मासळी आणायला जातांना तिनें ती चौकी कित्येकदां पाहिली होती.

समोर पोलिस चौकीची बैठी कोठी दिसतांच मेरी रोमांचित झाली. फटके,

दोरखंड, रडारड...सगळीं दृश्यें हवेंत दिसूं लागलीं. चौकींत चारपांच पोलिस आणि एक इन्स्पेक्टर होता. सारे इथेंच बसले होते अन् ती उगाचच तिकडे वाट पाहात होती ! पण आतां ती त्यांना सगळें सांगणार होती. घराकडे नेणार होती, अन् खुराड्याशीं उभें राहून सगळी गंमत पाहणार होती.

चौकीच्या दारांत मेरी उभी राहिली, पण कुणी तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं. एका जाडजूड इसमाला भिंतीशीं उभें करून इन्स्पेक्टर त्याला जोरानें दम देत होता. त्या इसमाची गयावया करण्याची पद्धत अन् इन्स्पेक्टरचा राक्षसी आविर्भाव पाहून मेरी नकळत चरकली. पोलिसांचे पट्टे, दांडकीं, बंदुका, अवजड बूट मोठे होत तिच्यापुढें दिसूं लागले. क्षणभर तिचें डोकें गरगर फिरलें. आपण इथें आलों कशाला, हें तिला कळेनासें झालें !

“ कोण ग तूं ? —” एका पोलिसनें मेरीला दारांत पाहून हटकलें.

“ चुकलेली दिसतेय् ! ” इन्स्पेक्टर तिच्याकडे वळून म्हणाला, “ काय ग, नांव काय तुझं ? कुणाची तूं ? ”

मेरीच्या तोंडून शब्द फुटेना. भोवतालीं जमलेलें पोलिसांचें कोंडाळें पाहून ती भेदरून गेली. मघांपासून भिरभिरणारा तिचा मेंदू जाग्यावर आला. दोन-चार दिवस चाललेला तिच्या मनाचा छंद नाहींसा झाला. इन्स्पेक्टरनें तिचा हात पकडतांच तिला आईची आठवण झाली. घरीं जावेंसें वाटलें, पण ती आतां लांडग्यांच्या तावडींत सांपडली होती. ते लोक आतां बाला मारतील नि तुरुंगांत टाकतील. आई रडत बसेल, बुढ्ढा नागू मरून जाईल व जॉन घोड्यावरून नाहींसा होईल. आपल्यालाहि मोडलेल्या घरांत किंवा कदाचित् ह्या चौकींतच कोंडून ठेवतील !...

“ ए मुली, कोण तूं ? कुठें राहतेस ? तुझा बाप काय करतो ? ” पोलिस विचारीत होते व खालीं मान घालून मेरी जेमतेम उभी होती. कसें सांगावें, कसें सुटावें, आईबापांना कसें वांचवावें, तिला कळेना. मोठ्यानें हंबरडा फोडावा व हात हिसकावून पळावें, असें तिला वाटलें. पण ती अधिकच कावरीबावरी झाली. सहनशक्ति संपुष्टांत आली, तेव्हां ती खालीं कोसळली नि रडत म्हणाली,

“ मॉ — मी चिंगीची कांचेची बांगडी चोरली. झाडाखालीं पुरली. मला पकडूं नका -- जाऊं द्या --”

● ● ●

# • ११ •

# बहरलेल्या हिंवाळ्यांत....

बहरलेल्या हिंवाळ्यांतल्या एका अर्धस्फुट पहाटे मी अचानक झोपेंतून जागा झालों व वानवडीच्या वाटेकडे फिरायला गेलों. त्याच वेळीं ती मला भेटली.

थंडीच्या दिवसांत फिरायला जाणं अगर लवकर उठणं हें माझ्या स्वभावांतच नव्हतं. माझा कार्यक्रम म्हणजे उबदार दुलईंत गुरफटून पडून राहायचं. उन्हं अगदीं अंगावर आलीं कीं सावकाशीनं उठायचं. अन् मग देखील वर्तमानपत्र वाचीत, कढत चहाचे घुटके घेत गरम कपडयांत बसून राहायचं.

पण आज पांच वाजतांच मी एकाएकीं सताड जागा झालों. थंडीची हुडहुडी भासली नाहीं. उलट पांघरुणाचं ओझंच वाटलं. चटकन् उठून मीं बर्फासारख्या गार पाण्यानं तोंड धुतलं, केस फिरवले, बूटपँट चढवली, पुल-ओव्हर कमरेखालीं व गळयाभोंवतीं ओढीत घराबाहेर पडलों.

शहराची सीमा ओलांडीपर्यंत मला अर्धवट अंधाराचं, बाजूच्या इमारतींचं अगर समोरच्या रस्त्याचं भानच नव्हतं. पुढें पुढें चालायचं एवढंच कळत होतं. गांवाबाहेर आल्यावर मात्र माझं लक्ष चौफेर जाऊं लागलं. अर्धवट उजेडांत दिसणारे दूरचे चर्चचे मनोरे, बाजूच्या टेकडया नि झाडं पाहात मीं रेंगाळत चालूं लागलों. लवकरच उजाडेल अन् गवताचे तुरे, झाडांवरची किलबिल अन् आकाशांतले रंग -- सारं सोन्यानें न्हाऊन निघेल, पुन्हां पुन्हां पाहावंसं वाटेल ह्या कल्पनेनें मी खुलून गेलों. सोडून दिलेली उबदार शय्या व लवकरच सामोरी येणारी सजीव सृष्टि ह्यांमध्यें मी वावरत होतों. अंग ऊन होत होतं नि हृदय वितळत होतं.

"अविनाश!" त्याच वेळीं वळणावरच्या कट्ट्याजवळून तिचा आवाज आला. एखाद्या जुनाट नि खोल विहिरींतून साद यावी तसा. तिचाच तो स्वर

हें मीं लगेच ओळखलं अन् दचकून दाही दिशांना पाहिलं.

कट्ट्याच्या पलीकडे तिची आकृति स्पष्ट दिसत होती. पाठमोरी, ओणवी. शुभ्र साडीनें वेढलेली. ती खालीं वाकून गवताचीं पानं खुडत होती. त्यावरचे दंवाचे थेंब बांगड्यांच्या नक्षीवर जमवीत होती. तिची आकृति नि खेळ पाहून मला जवळ जावं कीं तसंच पाहात राहावं, कळेना.

तेवढ्यांत ती अचानक वळली. दंवाचं पाणी चढलेल्या सोन्याच्या बांगड्या हलल्या व दोन्ही हात पुढें करीत हंसून ती म्हणाली, "आज विशेष खुषींत दिसते आहे स्वारी ?"

ती हंसतांच जणूं सूर्योदय झाला. कुरळ्या केसांच्या महिरपींत मोहरलेला मुखडा पाहात मीं तिचे हात हातांत घेतले. म्हटलें, "भेटलीस ! म्हटलं, येतेस कीं नाहींस ! — "

"म्हणजे—कमाल आहे तुझी ! मी केव्हांची उभी आहें इथें !" ती हात मागें घेत, बटा मागें सारीत, कृत्रिम कोपानें म्हणाली, "तुझं नेहमींचं — "

"बरं, चल आतां, वेळ दवडूं नकोस. भेटलसि नि लगेच भांडायला सुरुवात..."

तिच्या आविर्भावावरून तिला रुसायचं होतं, जरा विनोद करायचा होता, असं दिसत होतं. पण माझी घाई नि घोगरा स्वर पाहतांच ती निघाली. पदर ठीक घेत रस्त्यावर आली व मला बिलगून न बोलतां चालूं लागली.

आतां खरंच सूर्योदय होत होता. लहानपणीं चित्र काढावं तसा — खरंच दोन टेकड्यांच्या मधून सूर्य येत होता. टेकड्यांच्या उतारावरून सोन्याचा वर्ख उधळत होता. प्रकाशाचा प्रवाह दगडागोटयांतून व कानाकोपऱ्यांतून वाहूं लागला होता. आणि बाजूच्या बंगल्यांतून डंवरलेल्या लाजरस्ट्रोमियाचे गुलाबी गुच्छ खदखदां हंसत होते. आम्ही एकमेकांना अगदीं बिलगून चाललों होतों. तिनें आपला एक हात माझ्या कमरेभोंवतीं घट्ट लपेटला होता व दुसरा दुमडून, तिच्या खांद्यावरून खालीं आलेल्या माझ्या हातांत गुंतवला होता. मला भासत असे त्यापेक्षां ती चांगलीच उंच होती. आणि तिची चालहि जोरकस होती. ती कुठें पाहात होती हें कळत नव्हतं. मी समोर पाहात चाललों होतों. अन् नजर सोडून तिच्याकडे बघितलं तर सारीच समाधि भंगेल असं भय मला वाटत होतं.

वानवडीला वळण घालून आम्ही हडपसरच्या मार्गाला लागलों. न बोलतां, बिलगून बराच वेळ चालल्यानें आम्हांला ऊब आली होती. आणि कसला तरी विश्वास वाटूं लागला होता. कांहींतरी बोलायला मी उत्सुक होतों. डाव्या बाजूच्या दोन बंगल्यांकडे माझी दृष्टि गेली. सैन्यांतून निवृत्त झालेल्या एका बड्या अधिकाऱ्याची एक बंगली होती हें पाटीवरून स्पष्ट होतं. बांधणीवरून मालकाची सौंदर्यदृष्टीहि दिसत होती. पोर्चवर जी गच्ची ... मला वाटलं तिला हें दिसलं तर ती थांबेलच, अन् गच्चीच्या नाजुकपणावर व नाविन्या-वर तासभर बडबडत सुटेल. इतकं तिला स्थापत्यशास्त्राचं वेड. मागच्याच खेपेला शहराच्या विरुद्ध दिशेला आम्ही गेलों होतों तेव्हां ती आसासून जयकरांच्या बंगल्याबद्दल बोलली होती. आणि अखेर म्हणाली मात्र होती, ' आपण असं घर नाहीं बांधायचं. लॉंग आयलंड्मधल्या एका चित्रकर्तीच्या घराचा नकाशा आहे मजजवळ, तसं...'

पण तिचं लक्ष रस्त्यावर पडलेल्या एका काटकीकडे गेलं. खालीं वांकून तिनें ती उचलली व त्यावरचा शिंगांचा काटेरी किडा मला दाखवीत ती म्हणाली, " बघ रे — काय नांव ह्याचं ? तुझ्या त्या विकासवादांत हा कुठें बसतो ? ह्याची गोष्ट मला सांग ना. "

तिच्या चिमटींतून मीं ती काटकी घेतली आणि त्यावरच्या सुरवंटाकडे टक लावून पाहिलं. त्याच्या पायांना हरितरंजक द्रव लागलं होतं व त्याचे डोळे थकलेले दिसत होते. काटकी दूर करीत मीं म्हटलं,

" किती प्रश्न एकदम करतेस ? परीक्षकानंसुद्धां मला असं घाबरवलं नव्हतं —पण हा सुरवंट आपली अवस्था संपवीत आला आहे हं. लवकरच ह्याचं फुलपांखरूं होणार. "

" फुलपांखरूं ? रंगीबेरंगी, सारखं उडणारं ? " तिच्या कानांतले पांढरे टॉप्स, शुभ्र दंतपंक्ती, गळ्यातली मोत्यांची माळ व दाही बोटांचीं सफेत निमुळतीं नखं, सारीं एकदम झुललीं. " मग ह्याला आपण एखाद्या फांदीवर ठेवूं ! " काटकी नाजुकपणें धरीत ती बाजूचीं झाडं न्याहाळूं लागली. मध्येंच तिला काय वाटलं कुणास ठाऊक, ती पुरी थांबली व म्हणाली, " काय रे, माणसांत कां नाहीं असं ? आपलीं कां नाहीं फुलपांखरं व्हायचीं ? अंडीं, अळया

नि फुलपांखरं -- असं आपल्यांत असतं तर ? मी परी झालें असतें मग, नि पंख लावून-- "

" तूं परीच आहेस ! " मीं असं म्हणतांच तिची चर्या उतरली, खालीं वळली व तिच्या हातून काटकी खालीं पडली. मी झटकन् खालीं वांकलों. तो किडा धुळींत पडला होता. पालथं पडल्यानं त्याचे अनेक पाय वळवळत होते. ती वळवळ मला कशी तरीच वाटली. मी तसाच उठलों. पाहिलं तों ती जरा पुढें गेली होती. सुरवंटाला विसरून बाजूला बागडणाऱ्या एका बदकाकडे अचलपणें पाहात होती.

परी म्हटल्यानें तिनें चमकावं ह्याचा मला विस्मय वाटला होता. आणि आतां लगेच सुरवंटाला ती विसरून गेली ह्याचं मला वाईट वाटलं. इतक्या थोड्या अवधींत ही अशीं नाना रूपं दाखवते ! पण तिच्या चेहऱ्याकडे पाहतांच मी सारं विसरलों नि जवळ गेलों.

माझी चाहूल लागतांच ती मला चिकटली व तशीच बदकांकडे बघत राहिली. कडेला उभ्या असलेल्या मोटारच्या चाकांच्या चकचकीत हब् कॅप्वर तें बदक चोंच मारीत होतं. कॅप्वरचं प्रतिबिंब पाहून त्याला दुसरं कुणी बदक आल्यासारखं वाटत होतं. मध्येंच तें दूर जाई, गिरकी घेई व एकदम आपली चपटी चोंच चाकावर टोची.

" ए, ह्याला कुणी समजून सांगायला हवं रे ! " तिच्या निश्चल नजरेंत व्याकुळता गोळा झाली. " ह्याला कोण सांगणार ? बिचारं, बघ ना कसं करतंय्. तूं सांग ना — "

" मी कसं सांगूं ? अनुभवानें समजेल त्याला. नाहीं तर नाहींहि समजणार — "

" म्हणजे काय ? मग आपला, आपल्या ज्ञानाचा काय उपयोग ? -- "

" बदकांना अक्कल शिकवायला का आपण -- "

" जा, तुला समजतच नाहीं माझं म्हणणं — " ती फुरंगटून म्हणाली, " आपण कां नाहीं त्याची समजूत काढायची ? हें बदक, तूं, मी, तो किडा, हीं झाडं, हें गवत, ते दंवबिंदु, सारं सारं एकच कां नाहीं समजायचं ? -- समजत नाहीं मला. "

मलाहि समजलं नाहीं. मीं तिचं मनगट पकडलं व बदकापुढून तिला ओढून नेलं.

आतां आम्ही मघांसारखंच मूकपणें चाललों होतों. निसर्गाशीं एकरूप होणाऱ्या ह्या निर्व्याज मुलीचा मीं विरस केला असं मला वाटत होतं. पण तिनें मनाला लावून घेतलं नसावं हें तिच्या लचकत चालण्यावरून कळत होतं. माझ्या बुटाच्या टोंकावर तिचा सफेत सँडल येई आणि तिचा पडूं पाहणारा पदर मला वारंवार सांवरावा लागे, आंवरावा लागे.

मनांतली रुखरुख पुरी घालवावी म्हणून जणूं मीं म्हटलं, "तें बघ, त्या फांदीवर, तें घरटं कसं कोसळायला लागलं आहे."

तिच्यांतलं निसर्गाचं प्रेम किंवा मातृत्वाची भावना जागृत होईल व तें घरटं नीट ठेवायला ती सांगेल असं मला वाटलं. पण कमरेवर हात ठेवून ती म्हणाली,

"आपण तें घरटं खालीं काढूं."

"तूंच का बोलते आहेस ?—अग, त्यांत दोन तीन अंडीं नक्की असतील."

"म्हणूनच. तीं अंडीं आपण काढून घेऊं. अन् घरीं नेऊन त्यांचं झकास आम्लेट बनवूं. मी बनवीन-- "

आतां माझा चेहरा पडला. तिच्या स्वरामागचा, शब्दामागचा आशय मला उमगला. गतकाळांतल्या अनेक घटना स्मरल्या व मी खिन्न झालों. अडचणींत सांपडलेल्या मानिनीसारखे तिचे ओठ विव्हळत होते व तिच्या भोकरासारख्या डोळ्यांत सूडाची झांक तरळत होती.

"विसर सगळं--" मीं तिचे कमरेवरचे हात दूर करीत म्हटलं, "चल, खूप चालायचंय् आपल्याला."

"किती चालायचं अजून ?--पुरें नाहीं का झालं ? इतका वेळ, इतकीं वर्षं चालतोंच आहोंत कीं. कितवं रे वर्ष तुला ?"

"माझ्या वयाचं काय काढलंस ?"

"नाहीं, म्हणजे पळायला हवं का तें पाहतें."

"असं काय बोलतेस ?"

"मग काय तर ! ह्या प्रवासाचा कंटाळा आला आतां."

" मी तरी काय करूं? मी तरी काय करूं? "

मी तरी काय करूं? मी तरी काय करूं? — माझ्या हतबल उद्‌गारांचा आर्त प्रतिध्वनि सभोंवतीं सारखा उमटूं लागला. सामन शंकासुराचे नि वड-पिंपळाचे मोठाले जीर्ण वृक्ष दुतर्फा रांगेनें उभे होते नि ऋचा म्हटल्यासारखे म्हणत होते, मी तरी काय करूं? — सूर्यकिरणांत विणकाम करणारा एक कोळी फेऱ्या घालीत तेंच गुणगुणत होता. — अन् मागाहून किणकिणत येणारी सायकलहि तेंच सांगत होती. — काय करूं? काय करूं?...

मीं एकदम त्या सायकलवाल्याला हटकलें नि म्हटलें,

" कुठं निघालां पाव्हणे? "

" मांजरीला. "

" बराच लांबचा पल्ला आहे. अन् एका हातांत सायकल नि एका हातांत ही मोळी अशा थाटांत कसं जाणार? "

" काय करायचं? पुण्याला गेलों तवां सायकलवर भारं बांधून आणायचं, एवढंच डोक्यांत व्हतं. हँडल, नि करीयर भाऱ्यांनीं भरल्यावर मोळी घ्यायचं सुचलं. "

" मग असं करा ना. हँडलवरचे भारे हातांत घ्या नि असेच चालत या. आम्ही सायकल घेऊन पुढें होतों. कालव्याच्या कडयाशीं थांबतों."

पाव्हण्याला पटायला वेळ लागला. मग त्यानं ओझीं काढून घेऊन सायकल दिली. अन् तो पुढें निघाला.

ती म्हणाली, " आतां ओझं मी का? "

आम्ही दोघंहि हंसलों. ती उडी मारून पुढच्या दांडयावर बसली व दगड-गोटे चुकवीत सायकल उतरणीवर धांवूं लागली.

" सायकलवरून असं जाण्यांत कांहीं वेगळंच सुख आहे."

" काय म्हणालास? "

मीं पुन्हां कांहीं म्हटलं नाहीं. तिनें प्रश्न विचारतांना मान मागें झुकवली. त्यामुळें तिचे सुगंधित केस मला गुदगुल्या करूं लागले. तिचे गाल माझ्या हनुवटीवर टेकले. ती मला ओठंगून आली. आणि मग माझ्या उरल्यासुरल्या वृत्ती धुंद होऊन गेल्या.

पोलिसच्या चौक्या, सैन्याच्या छावण्या, गुरांचे गोठे, शेतकऱ्यांच्या झोपडया

मागें टाकीत आम्ही पुढें चाललों होतों. सूर्यकिरणांची झालर सडकेवर पसरली होती आणि दोन्ही बाजूला दिसणाऱ्या कोबीच्या, काकड्यांच्या, द्राक्षांच्या नि गवतांच्या पिकांवरून थंडगार वारा सुटला होता. ह्या सुखद वातावरणांतून एखाद्या वहात जाणाऱ्या पिसासारखीं आम्ही जात होतों. आमचीं मनं नि शरीरं एक झालीं होतीं. नाहींशीं होत होतीं.

कालवा आडवा आला तेव्हां किनाऱ्याशीं झुलत येणाऱ्या हंसासारखी सायकल येऊन थांबली. आम्ही नकळत उतरलों व बाजूच्या दगडी चौथऱ्या-वर टेकलों. जलाशयाच्या सान्निध्यांत विसांवा घ्यायला मिळाला म्हणून आम्हांला अधिकच सुखावल्यासारखं झालं.

पाव्हण्याची फार वेळ वाट पाहावी लागली नाहीं. एका ओळखीच्या बैल-गाडींतून तो उधळीत आलाच. सायकलसकट परत गाडींत चढूं लागला.

कांहीं तरी बोलायचं म्हणून मीं म्हटलं,

“ तुम्ही आपल्या कारभारणीला कां नाहीं बरोबर नेत ? जातांना सायकल-वरून दोघांना मजेंत जातां येईल नि परततांना भारे उचलायला तिची मदत होईल. ”

सायकल पंक्चर वगैरे झाली काय हें पाहात पाव्हणा मिशांत हंसला. म्हणाला, “ तुमचं ठीक आहे साहेब. पर आमी राजारानीवानी कसं राह्यचं ? कारबारनीला घरीं काम असतं. भाकऱ्या बडवायच्या असतात. शिवाय चार गुरं नि सहा पोरं आहेत. -- ती दूर दिसते ना, ती आमची वाडी...”

दूरवर दिसणाऱ्या झोपड्या पाहण्याचा आम्हीं डोळे फाडून यत्न केला. पण तेवढ्यांत बैलगाडी धांवूं लागली अन् सगळीकडे धूळच धूळ झाली.

ती तरारून उठली. माझा हात ओढीत म्हणाली,

“ ह्या रस्त्यावर नको. हा ओझेवाला इसम अन् त्याची सहा पोरांची बायको नि मोडकी झोपडी — हें पाहायला का भेटलों आपण ? आपण कालव्याच्या कांठानें आंत जाऊं ! चल. ”

मुख्य सडक नि बाजूच्या वाड्या सोडून आम्ही निघालों. कालव्याच्या कडेनें, प्रवाहाच्या विरुद्ध हळूहळू चालत गेलों. ओलसर पाऊलवाटेवर उमटत जाणाऱ्या सॅंडल्सच्या आकृतींवर मी बुटांचे पाय टाकीत सप्तपदी घातल्या-सारखा जात होतों. तिच्या पदराचं टोंक माझ्या बोटांतल्या अंगठींत मीं

गुंतवून टाकलं होतं. गांठ मारून लग्नमंडपांत जावं तसं आम्ही सूर्यफुलांच्या रोपट्यांमधून जवळच्या मळ्यांत गेलों. निर्मनुष्य जागीं, निसर्गाच्या गुंफेंत आलों.

स्वच्छशी जागा पाहून तिनें बैठक मारली. पायांतले सँडल्स काढून टाकून मग ती कानांतले टॉप्स सोडवूं लागली.

अंगठीशीं चाळा करीत मीं विचारलं, " काय करतेस ? "

" मी हे अलंकार उतरवतें... आणि वस्त्रंसुद्धां ! "

तिचे स्पष्ट शब्द नि संथ दृष्टि माझं हृदय हलवून गेलीं. एवढ्यासाठींच मीं तिच्या शोधांत फिरतों, एवढ्यासाठींच मीं तिला इथें आणलं, असं तर नाहीं वाटलं हिला ?

" असा पाहूं नकोस ! " बाजूनें डोकावणाऱ्या फांदीवर गळ्यांतली माळ फेकीत ती म्हणाली, " तुला मी सगळी हवी आहें, हें कां लपवतोस ? -- किती दिवस लपवतोस ? "

" हो, पण एवढ्यासाठीं — "

" एवढ्यासाठीं आतां दुसरे विषय नकोत. निसर्गाचीं गुपितं आपण इतका वेळ पाहिलीं. माणसांच्या संसाराची तऱ्हाहि नुकतीच ऐकली. आतां आपली रीत जगाला शिकवूं नि आपलीं गुपितं निसर्गाला दाखवूं. "

तिच्या डोळ्यांतला उन्माद माझ्या अंगावर उमटत होता. माझं हृदय गलबलून गेलं व मग सारखं स्पंदन करूं लागलं. भोंवतालचीं गवतं नि झुडपं, खालचीं ढेकळं नि वरचे ढग—सारं प्रेक्षकांसारखं तटस्थ झालं. पाहायला, ऐकायला उत्सुक झालं. तिच्या साडीला आतां फक्त माझ्या अंगठीचा आधार होता. मीं अंगठी उतरवली नि मातींत पुरली.

तिचा देह मला नवीन नव्हता. तरी ती तेजःपुंज आकृति पाहून मी दिपून गेलों. माझ्या कलासक्त आत्म्याला आदिमायेचं दर्शन झालं होतं. आणि जगांतल्या सर्वश्रेष्ठ सौंदर्याचा आदर्श माझ्या मृण्मय शरिरापुढें उभा होता...

— मातींतली अंगठी मी परत शोधूं लागलों तेव्हां आकाशाकडे पाहात ती विचारीत होती,

" पूर्णत्व, पूर्णत्व तें हेंच काय ? साऱ्या संसाराचा, प्रवासाचा हाच शेवट असतो काय ? "

मीं अंगठी मिळवली. तिचे अलंकार गोळा केले. ते घेत ती म्हणाली,

" आतां तुला तुटकपणा वाटेल ना ? मी नकोशी होईन ना ? पुन्हां तूं लवकर भेटणार नाहींस ना ? "

मीं किंचित् कठोरपणें म्हटलं, " असं कां बोलतेस मुद्दाम ? मला तूं किती हवी आहेस हें ठाऊक नाहीं हो तुला ? "

तिचे डोळे पाण्यानें भरले. म्हणाली, " रागावलास ? "

" नाहीं. पण आतां मी तुला सोडणार नाहीं. तुला घेऊन जाणार. "

" तुझ्या कलेंत अडसर घालायला ? तुझ्या ध्येयांत धोंड म्हणून ? "

" काय तें बघूं मग ! मला—"

" तुला दुसऱ्या मुली मिळतील. हा पुलओव्हर वहिनींच्या बहिणीनें करून दिला ना ?...ऑफिसांतली ती भोकराच्या डोळयांची विधवा तर रोज जातां-येतां सोबत करते कीं तुला...मुंबईच्या स्त्रीचीं तुझ्या कवितेची प्रशंसा करणारीं पत्रं अजून येतात का नाहीं हें मात्र मला ठाऊक नाहीं. ..." आसवं ओघळत असतांनाच ती वेड्यासारखी हंसूं लागली.

तिच्या हंसण्यापुढें माझे शब्द लटके पडणार कीं काय ह्या भीतीनें मी व्याकुळ झालों. तिच्यासाठीं मी डोळयांत प्राण आणून वर्षानुवर्षं वाट पाहात आहे हें तिला ठाऊक होतं. म्हणूनच जणुं ती अशी थट्टा करीत होती. मीं तिला बळजबरीनें उचललं व मळयाबाहेर आणलं.

" कुठें जायचं ? "

" घरीं म्हणून सांगितलं ना ? "

" म्हणजे एखाद्या वाडींत, झोपडींत ? तूं सायकल घेऊन भारे वहायला जाणार अन् मी गुरं नि पोरं संभाळणार ! "

" तुझं माझ्यावर प्रेम आहे कीं नाहीं ? " आतां माझे डोळे भरून आले. ती खालीं उतरली, पण बिलगून उभी राहिली. सभोंवतालीं पाहूं लागली. येथंच, ह्या मळयांत, कालव्याच्या कांठाला, एखाद्या घरट्यांत, फुलपांखरां-सारखं राहूं, कायमचं राहूं, असं तिला सुचवायचं होतं. पण आतां उन्ह रणरणत होतं. झाडांच्या सावल्यांचं गूढ नि पक्ष्यांच्या किलबिलाटाचा गोडवा संपला होता. श्रमानें, भुकेनें, धुळीनें नि उन्हानें मलूल वाटत होतं.

तिच्या दृष्टींत अनेक भाव चमकून गेले. अखेर माझ्या खांद्यावर माथा टेकून ती म्हणाली, " चल, येतें मी ! "

मी नकळत हंसलों. माझी छाती ताठ झाली. विजयी वीरासारखा मी निघालों. तीहि खुषींत यावी म्हणून तिला गुदगुल्या केल्या.

" नववधूची अशी थट्टा करतोस ? "

" नववधू ? युगं न् युगं तुला मी ओळखतों. आज तीन तपं तर सारखी सोबत करते आहेस कीं... "

ती कांहीं बोलली नाहीं. हातांत हात घालून आम्ही कालव्याचा कांठ संपवला व कट्ट्यापाशीं आलों.

ती एकदम थांबली. " आतां तुझी हद्द. तुझ्या वाडीची, झोपडीची वाट. तर मग मला न्यायला गाडी आण. सायकल तरी आण."

मी थबकलों नि चढत्या आवाजांत म्हटलं, " पुरे झाला खेळ. चल पाहूं — "

चल पाहूं – चल पा...माझे शब्द कालव्याच्या पाण्यांत गुदमरून वाहून गेले असं मला वाटलं. मीं घाबरून तिला धरलं.

' आण ना कांहीं वाहन ! तोंपर्यंत मी माझीं फुलं, सुरवंट, बदकं गोळा करतें. "

" मी जाईन हं अशानें ! " मीं पाऊल पुढें टाकीत म्हटलें. ती कट्ट्यावर टेकली व रुसण्याचा आविर्भाव करूं लागली. मी जरा पुढें गेलों व हंसून वळून पाहिलं. तिनें हंसणं आवरलं नि रागाचा अभिनय करून मान फिरविली. मीं ओळखलं कीं ही पुरेपूर प्रेमांत, पाशांत सांपडली आहे. जरा टांगा टाकीत गेलं कीं ही मागोमाग धापा टाकीत धांवत येईल.

पुलओव्हरवरची धूळ झटकीत मी पुढें झालों. पांच पावलंच गेलों नि कसल्याशा धास्तीनें थबकलों. मागें वळून पाहिलं. अन् डोळे फाडून पुन्हां पुन्हां पाहिलं. ती तिथें नव्हती ! ती नव्हती, नाहींशी झाली होती !

—क्षणार्धांत मला सारं समजलं. पण मन विश्वास ठेवायला तयार होईना. ती तिथेंच असली पाहिजे, जवळपास लपली असली पाहिजे, असा टाहो मनांत सुरू झाला. काय करावं, कळेना. तिचीं नाना रूपं मीं पाहिलीं होतीं, पण तिचं नांव मला ठाऊक नव्हतं. जीभ तुटल्यासारखा मी स्तब्ध होतों. ती

दिसत नव्हती. तो कट्टाहि दिसत नव्हता. तिथें नव्हताच तो कट्टा. कालव्याची नागमोडहि चांगली मैलभर दूर होती. पाय चिकटल्यासारखा मी उभा होतों. एकाकी, हतभागी. आणि भोंवतालचे वृक्ष नि पक्षी माझं सांत्वन करीत होते.

——मग मी वळलों व आल्या मार्गानें परत निघालों. दीर्घ विरहकाळ डोळयांपुढें आणि दूरचा पल्ला गांठायचा. रेसकोर्स, सोलापूरबाजार, शंकरशेट रस्ता, टिळक रस्ता नि नवी पेठ. खोलीला कुलूप लावलंय् कीं नाहीं ह्याचाच मला विचार पडला. खोलीचं कुलूप, नि खोलींतली एकाकी शय्या, पेटींतलीं जीर्ण पत्रं, काल रात्रीं अर्धवट लिहिलेली कविता, भिंतीवर लटकणारी ती तसबीर...

उन्हानें अंग तडतडत होतं नि उबेसाठीं माझ्या मठींत मी परतत होतों.

